# विषयानुक्रम



# प्रस्तावना



आपल्यापैकी सर्वांनाच कथा आवडतात. त्यातील काही भाग्यवंत हे कथा वाचतात, ऐकतात आणि काही कथांचा आनंद घेतात, ज्यांची स्मृती ही अनेक महिने, वर्षे आणि दशकही मनामध्ये रेंगाळत राहते. कथांमुळे आपलं शिकणं सुधारतं, अनुभव समृद्धता येते आणि आजुबाजूच्या जगाचा तर नितांत सुंदर अनुभव येतोच येतो. त्याशिवाय काही तत्त्वे आणि सत्ये यांचे आपल्याला असे ज्ञान होते की ज्यामुळे आयुष्य नावाच्या आश्चर्यकारक प्रवासामध्ये मार्गदर्शनही मिळते. कथांमध्ये जी जादूई मोहिनी असते, त्याचा तरुणांवर आणि त्यांच्या हृदयावर निश्चित परिणाम होतो.

कथांमुळे आपल्याला एक वेगळी दृष्टी मिळते ज्यामुळे भविष्यकालीन सुस्थितीसाठी आयुष्यातील आव्हाने आपण रचनात्मक पद्धतीने स्वीकारु शकतो. काळ जसा जात राहातो तसे आपण वेळेच्या न संपणाऱ्या आव्हांना समोर उभे असतो आणि यातून सुटका करण्यासाठी या कथा मदतीला येतात. कथा या काही मिनिटातही वाचून होतात. आपली मनोवस्थाही क्षणार्धात बदलवतात आणि आपल्या हृदयाच्या स्पंदनामध्ये आपल्या जीवनाविषयी काही गुणवत्ताही मिसळतात.

मी सिंगापूरला डॉ. जी. फ्रान्सिस झेव्हियर यांना भेटलो आणि त्यांची ऊर्जा, त्याचं झोकून देऊन काम करणं आणि त्यांचा उत्साह यांनी प्रभावित झालो. मग शिक्षण, वैयक्तकि विकास यावर आमची चर्चा झाली, आत्मविकास आणि आत्मभान यावरचे त्यांचे कार्यक्रम जे सिंगापूर आणि भारतामध्ये झाले त्यावर आमची चर्चा झाली. या प्रशिक्षणातील महत्त्वाचा भाग म्हणजे डॉ. फ्रान्सिस झेव्हियर हे ‘कथा ध्यान’ घेतात. शिक्षणात वेग यावा म्हणून त्यांनी शेकडो कथा वापरल्या आहेत आणि कथांच्या तात्पर्यांवर विशेष जोर दिला आहे. काही वर्षांपूर्वी त्यांनी घेतलेल्या अशा कार्यक्रमांमध्ये सहभागी झालेल्या विद्यार्थ्यांनी या कथा पुस्तक रुपाने प्रकाशित व्हाव्यात, असा आग्रह धरला होता. आनंदी अशा या पुढाकाराला माझाही पाठिंबा आहे, हे मला सांगावसं वाटतं.

आपली स्वत:ची ओळख पटण्यास आणि प्रकट होण्यास जी अंत:दृष्टी लागते, ती या कथांमधून विकसित होईल याची मला खात्री आहे. या कथा वाचकांच्या चेहऱ्यावर हास्य आणतील, त्यांना शिक्षण देतील, त्यांचं मनोरंजन करतील आणि प्रेरणाही देतील. या कथा सर्वांना आवडतील, शिक्षण, अध्यापन, मित्रमंडळीशी गप्पा मारताना, कुटुंबात, सहकाऱ्यांना, सोबतच्या इतर कुणाला आणि आपल्या स्व‘लाही या मदत करतील.

कथावाचन, इतरांसोबत कथांची मजा घेण्यासाठी आणि सांगण्यासाठी शुभेच्छा !

- डेव रॉजर्स,
निर्देशक, कॉपिटिटिव्ह एज,
सिंगापूर.

# उपोद्घात



मी एक जबर वाचक आहे आणि त्यातल्या त्यात मला व्यक्ति विकासावरची पुस्तकं वाचायला खूप आवडतात. माझं स्वत:च व्यक्तिमत्व अजून विकसित कसं होईल यासाठी मी या साऱ्या गोष्टी करीतच असतो. हा माझा दीर्घोद्योग जवळपास चाळीस वर्षे अव्याहत सुरु आहे.

'टॅप युवर जिनियस' या माझ्या कार्यक्रमामध्ये जवळपास एक हजार प्रेरणादायक कथा मी वापरल्या आहेत. हा एक तंत्रावर आधारित बहुआयामी असा व्यक्तिमत्त्व विकासाचा कार्यक्रम आहे जो त्यात भाग घेणाऱ्या व्यक्तीच्या बुद्धीमत्तेला चालना देणारा आहे. जे काही शिकवणं सुरु आहे, त्याच्याशी सुसंगत अशी एक कथा मी सांगत असतो जी तत्त्वज्ञानाने, तत्त्वाने आणि आत्मविकासाच्या सरावाने अगदी भरलेली आणि भारलेली अशी असते. कथेचा शेवट कधी सांगितला जात नाही आणि त्यात भाग घेणाऱ्यांना उत्तर सांगण्यासाठी आग्रहाने बोलावले जाते. याला मी सरळ 'कथा ध्यान' असा शब्द वापरला आहे.

माझ्या कार्यशाळेत भाग घेणारे कथांचा आस्वाद घेतात. त्यांच्याच आग्रहाने मी 'विश्वातील सर्वोत्तम प्रेरणादायी कथा' हे पुस्तक लिहिले, ज्याच्या हजारो प्रती देश आणि विदेशामध्ये गेल्या आहेत.

'१०१ प्रेरणादायी कथा' हे पुस्तकही अतिशय काळजीपूर्वक निवडलेल्या कथांमधून तयार झालेले आहे. ज्या कथांमधून मला स्वत:ला जास्त प्रेरणा मिळालेल्या आहेत, त्यांचाच समावेश मी या पुस्तकांत केला आहे. त्यांचे स्त्रोत वेगवेगळे आहेत. त्या कथांसाठी वापरलेली भाषा आणि त्या कथेचं तात्पर्य सांगण्यासाठी केलेलं विश्लेषण एवढाच माझा काय तो सहभाग आहे.

या पुस्तकाचा जास्तीत जास्त फायदा होण्यासाठी एक करा, कथा वाचा. शेवटी दिलेल्या दोन प्रश्नांवर विचार करा. संभाव्य उत्तरांचा विचार करा. मग दिलेली उत्तरं पाहा. जर या मार्गाने तुम्ही गेलात तर तुमची सर्जनशीलता वाढेल आणि या पुस्तकातून तुम्हाला जास्तीत जास्त गमक मिळेल.

पालकांनो, हे पुस्तक तुमच्या मुलांना भेट द्या. त्यांना फक्त या कथाच आवडतील असं नाही, तर तुमच्या उपदेशाविनाही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा फार चांगला विकास होऊ शकेल.


- डॉ. जी. फ्रान्सिस झेव्हियर, पीएच. डी.

३५८, ८ मेन, विवेकनगर, बंगलोर - ५६००४७.

मोबाईल : ०९४४९५४४३५८ / ०९३४३७२१८२०

ई-मेल : gfrancisxavier@yahoo.co.in

# ॠणनिर्देश



माझ्या या लेखन कामासाठी ज्यांनी प्रेरणा दिली आणि ज्यांनी माझे धैर्य वाढवलं, अशा सर्वांचा मी अतिशय ऋणी आहे. मुख्य प्रशिक्षक आणि 'कॉम्परेटिव्ह एज, सिंगापूर' या संस्थेचे निर्देशक श्री. डेव रॉजर्स यांनी माझ्या पुस्तकाला जी समर्पक प्रस्तावना दिली त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

श्री. आकाश शहा, प्रकाशक आणि श्री. आर. एच. शर्मा, प्रमुख संपादक, जयको पब्लिशिंग हाऊस, मुंबई यांनी हे पुस्तक अतिशय आकर्षक स्वरुपामध्ये छापल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

माझे सारे मित्र आणि माझ्या वेगवेगळ्या कार्यशाळेतील सहभागी यांचेही मी आभार मानणं गरजेचं आहे. त्यांच्या नावांची यादी तशी फार मोठी होणार आहे. तथापि, काही लोकांचा उल्लेख करणे गरजेचे आहे. त्यांची नावे क्रमश: देत आहे.

व्ही. आचार्य, अमुधा पी. कंडासामी, अर्पुदामॅरी, अरुलमारीयंथन, बाबू के, वर्गीस, भारत कपासी, बिशप, स्व. जोसेफ डिसिल्वा ब्र. जेकब इझ्हॅनीकट, आर. देवराज, एल्गी डॅनी, इम्यॅनुअल दास, इथिराजूलु नायडु, पी गॅस्पर, के. जे. जॉर्ज, फा. गिरी राजू, गिरी राव, गुनाकोडीसेखर, इलियास मोंत्री, इंद्रजीतसिंग, जेकब अब्राहम, जयप्रकाश तिवारी, फा. जयनाथन, जॉन जोसेफ, डॉ. एम. जोसेफ, आय जोसेफ व्हिक्टर, के. ज्योतिरामलिंगम, मिसेस कल्पा राजेश, एम. कंडासामी, आर कंथराज, कृष्णाकिशोर, एम कुरुवन, मधू, मालती गेरार्ड, व्ही. मणीकेसी, एम. एस. मजुंनाथ, मेरी ऑकेलो, एम. बी. मेटी, डॉ. के. नक्कीरन, के. के. नंबुद्री, ओ. पी. नारंग, पी. नारायण भट, सर निकोलो स्प्रेंगर, निगेल फर्नांडिस, पॅट्रिक डिसूझा, डॉ. स्व. पायस के. ऑकेला, फा. प्रदीप सेक्विरा, प्रल्हाद एन. कालरा, प्रकाश गंगाराम, क्वेदेशिया गांधी, राधाकृष्णन, राजेश के. पडिया, राजीव बेरी, ई. रवीचंद्रन, जे. एन. रेडडी, रेनहार्ड स्प्रेजर, फा. रोन्नी प्रभू, मिसेस शैला जॉर्ज, शंकर भावसार, षण्मुगम वर्मा, सायमेन लॉर्ड, स्टॅनली कारकडा, स्टिव्हन पिंटो, आर. सुंदरराज, सुनिल रावल, डी. थंकराज, एम. व्ही. एम. वेलुमुरुगन, एम. विजयकुमार, विन्सेन्ट ए. पिंटो, येसूदासन मॉरीस.

माझ्या या लेखनकाळामध्ये मला सतत मदत करणाऱ्या माझ्या कुटुंबियांचाही मी ऋणी आहे. माझी पत्नी ए. अॅन्टोनियाम्मल, माझी मुले आणि त्यांचे जीवनसाथी डॉ. डेनिस, फ्रीडा, प्रकाश, रुपा, शीला, पीटर आणि माझी नातवंड निकिता, अॅलन, प्रीथीका आणि रोझान्ना यांचाही आभारी आहे.

- डॉ. जी फ्रान्सिस झेव्हियर, पीएच.डी.

# १

# तुमच्या शत्रूचे हृदय जिंका



एका यशस्वी व्यापाऱ्याचं अतिशय सुसज्ज असं किराणा दुकान होतं. त्याचा व्यवसायही चांगला भरभराटीला आलेला असा होता. अर्थात् अनेक गिऱ्हाईक आपल्याकडेच अगदी विश्वासाने येतात आणि त्यांच्या दैनंदिन गरजा आपल्याकडेच खरेदी करून भागवतात, या विचाराने तो आनंदी होता. त्याच्याच दुकानासमोर एक मोठे आणि सुसज्ज डिपार्टमेंटल स्टोअर बांधले जात आहे, ही गोष्ट मात्र त्याच्यासाठी फार धक्कादायक आणि निराश करणारी अशी होती. त्या व्यापाऱ्याला असं वाटत होतं की हे नवं दुकान आता आपला धंदा बंद करणार. त्रस्त होऊन तो त्याच्या गुरुकडे गेला आणि त्याला त्याने सांगितलं की हे दुकान जवळपास शतकापासून त्याचं पिढीजात आहे. ते गमावणं म्हणजे त्याच्यासाठी फारच नुकसान करणारं आहे, कारण त्याच्याजवळ दुसरा कुठला व्यवसाय करण्याचं कौशल्यही नाहीये.

गुरू म्हणाले, ''जर तू त्या नव्या दुकानाच्या मालकाला घाबरत असशील, तर तू त्याचा तिरस्कार करशील आणि हा तिरस्कार म्हणजे तुझी अधोगती आहे, असं समज.''

''मग मी काय करु?'' त्या भ्रमिष्ट व्यापाऱ्याने विचारले.

''रोज सकाळी दुकानाच्या बाहेर येऊन रस्त्यावर उभा राहात जा आणि तुझ्या दुकानाला चांगले आशीर्वाद दे, त्याच्या भरभराटीची इच्छा कर. मग तुझ्या समोरच्या त्या नव्या दुकानाकडे बघ आणि त्यालासुद्धा तसेच आशीर्वाद दे.''

''काय? माझ्या स्पर्धकाला आणि माझा सर्वनाश करणाऱ्याला आशीर्वाद...?''

''तू त्याला जे चांगले आशीर्वाद देशील तेच तुझ्याकडे परतून येतील. तू त्याच्यासाठी ज्या संकटाची इच्छा करशील ते संकट तुझाच विनाश करेल.''

एका वर्षानंतर तो व्यापारी गुरुला सांगण्यासाठी आला की घाबरल्यामुळे त्याला ते दुकान बंद करावं लागलं आहे.

## ■ प्रश्न :

- त्या व्यापाऱ्याने दुकान का बंद करुन टाकले?

- या कथेचं तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- तो आता त्या डिपार्टमेंटल स्टोअर्सचा मालक झाल्याने त्याला तर छोटं किराणा दुकान बंद करून टाकावं लागलं.
- आपण एकटे कधीही जगू शकत नाही. कारण विश्वातील प्रत्येक घटक हा दुसऱ्याशी सूत्राने बांधलेलाच असतो. हे एक वैज्ञानिक असं सत्य आहे. आपल्या विचारामध्ये विभिन्न पातळ्यांमध्ये फिरण्याची क्षमता असते. आपल्या अनुभवाला येणारी किंवा आपण मनात बाळगलेली प्रत्येक भावना समग्र विश्वाला व्यापून टाकते. एखाद्या व्यक्तीविषयी आपण बाळगलेली चांगली भावना ही त्याच्यापर्यंत अजाणतेपणीही पोहचतेच. प्रत्येक व्यक्ती इतरांच्या चांगल्या वा वाईट भावना (कोणत्या का मार्गाने होईना, पण) समजून घेऊ शकतो. जाणतेपणी वा तुमच्या शत्रूचे हृदय जिंका अजाणतेपणी आपल्या आयुष्यभर हे अपरिहार्य असे घटित घडतच असते. जेव्हापासून त्या किराणा व्यापाऱ्याने त्या डिपार्टमेंटल स्टोअरच्या मालकाचा तिरस्कार करणे सोडले आणि एवढचं काय पण त्याला आशीर्वादही दिले, ते दोघे मित्र बनले आणि तो किराणा व्यापारी त्या डिपार्टमेंटल स्टोअरचा भागीदारही बनला. त्या किराणा दुकानदाराचा अनुभव अर्थात् बराच असल्यामुळे तो अतिशय सक्षमतेने ते स्टोअरही चालवू शकला. सरतेशेवटी, त्या मालकाने त्या डिपार्टमेंटल स्टोअरचे सारे अधिकार त्या किराणा दुकानदाराकडे देऊन टाकले आणि तो स्वत:चं भलं व्हावं म्हणून शहर सोडून दुसरीकडे गेला.

## २

# शिक्षण आणि शहाणपण यातील फरक



एका कंपनीमध्ये दोन कर्मचाऱ्यांची भरती करण्यात आली, दोघेही सारखेच सक्षम आणि हुशार होते, पण दोघांची पार्श्वभूमी वेगवेगळी होती. हा कर्मचारी जरा आधुनिकतेचा स्पर्श झालेला, छानछौकीत राहणारा, आत्मविश्वासपूर्ण आणि देशातल्या एका गाजलेल्या संस्थेमध्ये शिकलेला असा होता, तर दुसरा ब हा जरा त्यापेक्षा जरा कमी वाटणारा पण जरा मुत्सद्दी, पहिल्याच्या तुलनेमध्ये फार चांगलं शिक्षण घेतलेला असा नाही, पण काही वर्षांचा अनुभव घेतलेला असा होता. तथापि, त्या दोघांमध्ये दुसरा कर्मचारी ब हा नेहमीच 'जरा जास्त शहाणपण आहे', असं मानला गेलेला आणि चांगल्या संधी कायम ज्याला दिल्या जातात असा होता. तेव्हा अ हा कर्मचारी जरा नाराज झाला आणि आपण ब पेक्षा एवढे चांगले शिक्षण घेतलेले असतानाही आपल्याजवळ त्याच्यापेक्षा शहाणपणा कमी आहे, असं का वाटते हे विचारायला कंपनीच्या अध्यक्षांकडे गेला. अध्यक्षांच्या उत्तराने अ ला जीवन म्हणजे काय, याचे यथार्थ दर्शन झाले.

### ■ प्रश्न :

- अध्यक्षांचे उत्तर काय होते?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- अध्यक्ष म्हणाले,''शिक्षण हे पुस्तक वाचून वा वर्गातील व्याख्याने ऐकून मिळवता येते. पण शहाणपण हे फक्त 'तुम्ही स्वत:' हे एकमेव पुस्तक वाचून मिळते.''
- ज्ञान मिळवणे ही प्रक्रिया पुस्तकं वाचणे आणि वर्गात शिकवले जाणारे ऐकणे, अशी क्रियाशून्य आणि फार वरवरची अशी आहे. हे म्हणजे केवळ उसन्या गोष्टी आणून कोंबून भरणं आहे. 'तुम्ही स्वत:ला पुस्तकासारखं वाचणं' या प्रक्रियेमध्ये विचार, कल्पना, भविष्यवेध, निर्णय वगैरे सारं काही आहे. ही प्रक्रिया सक्रिय आणि आंतरिक आहे. त्या मुलभूत आणि सर्जनात्मक आहे. हे जग वैज्ञानिक आणि तंत्रज्ञानामध्ये प्रगती करू शकले ते अशाच लोकांच्या परिश्रमाने जे कल्पना करू शकले आणि भविष्याचा वेध घेऊ शकलेले आहेत. कल्पना करणे हे नुसत्या साऱ्या कोरड्या

ज्ञानापेक्षा जास्त महत्त्वपूर्ण आहे. शहाणपण हे 'स्व'च्या ज्ञानातून प्रकट होते. 'स्वत:ला असं पुस्तकासारखं वाचणं', हे काही सरतेशेवटी सोपे काम नाही, दिवसाच्या प्रत्येक क्षणाला या पुस्तकाची नवी आवृत्ती निघत असते.

## ३

# हास्याच्या साम्राज्यात प्रवेश करा



गुरु जरा प्रसन्न मनस्थितीमध्ये होते, म्हणून त्यांच्या शिष्यांची अशी इच्छा झाली की ईश्वराचा शोध घेण्याच्या मार्गात त्यांना कोणकोणत्या टप्प्यातून जावे लागेल, हे जाणून घ्यावे.

''देवाने मला प्रथम हाताला धरून कर्माच्या भूमीमध्ये नेले, जेथे मी बरीच वर्षे काढली'', ते सांगू लागले, ''मग तो पुन्हा आला आणि त्याने मला दु:खाच्या राज्यामध्ये नेऊन सोडले जिथं प्रत्येक अनिर्बंध आसक्तीने माझं हृदय अगदी पिटून जाईल, इतपत मी राहिलो. मग कुठे मी स्वत:ला प्रेमाच्या हाती सोपवले गेलेले पाहिले, ज्यामुळे माझ्यातील जे काही स्वत:चं असं उरले ते जळून गेले. मग तो मला असीम शांततेच्या प्रांतामध्ये घेऊन गेला, जिथं माझ्या काही तरी वेगळं शोधणाऱ्या डोळ्यांसमोर जीवन आणि मृत्यूची रहस्ये प्रकट झाली.''

''ही तुमच्या शोधाची अंतिम स्थिती होती का?'' त्यांनी विचारलं.

''नाही..'', गुरु म्हणाले, आणि त्यांनी सांगायला सुरुवात केली...

### ■ प्रश्न :

- गुरु त्यानंतर शिष्यांना काय म्हणाले?
- या कथेचं तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- एके दिवशी देव म्हणाला, ''आज मी तुला देवळाच्या अगदी आतल्या गाभाऱ्यात नेणार आहे, अगदी साक्षात् ईश्वराच्या हृदयातच,'' आणि मला हास्याच्या साम्राज्यात नेलं गेलं.
- जेव्हा तुम्ही हसता, तुम्ही आनंदी असता, जेव्हा तुम्ही आनंदी असता तेव्हा तुमच्या मनामध्ये तिरस्कार, क्रोध, असूया आणि इतर नकारात्मक भाव नसतातच. नकारात्मक भाव जेव्हा नसतात, तेव्हा प्रेम आणि करुणा उत्पन्न होते. आध्यात्मिकतेची ही अंतिम पायरी आहे. हे कुणालाही अगदी सहजपणे फक्त हसण्यातून साधू शकते.

४

# विकारांना करुणेने समजून घ्या



चीनमधल्या एका वृद्धेने एका धर्मगुरुला जवळपास वीस वर्षांपेक्षा जास्त काळ मदत केली होती. तिने त्याच्यासाठी एक लहानशी झोपडीही बांधून दिली होती आणि तो सर्वकाळ ईश्वराच्या प्रार्थनेमध्ये असल्याने त्याच्या पोटापाण्याची व्यवस्थाही तीच बघत असे.

सरतेशेवटी या माणसाने काय प्रगती केली आहे, असा विचार तिच्या मनामध्ये आला. तिने एका मुलीच्या मदतीने त्याची परीक्षा घेण्याचे ठरवले. ''त्याच्या झोपडीमध्ये जा आणि त्याला मिठी मार'', तिने त्या मुलीला सांगितले. एका रात्री त्या मुलीला बोलावण्यात आले, तो प्रार्थनेला बसला आहे का, हे पाहण्यास सांगण्यात आले. पुढचा काहीही विचार न करता तिने त्याला कुरवाळायला सुरुवात केली आणि म्हणाली, ''आता आपण काय करणार आहोत?'' तोवर धर्मगुरुचा संताप पार टोकाला पोहचला, त्याने झाडू हातात घेतली आणि त्या मुलीला झोडपत बाहेर काढले.

ती मुलगी परतली आणि तिने झालेली घटना त्या वृद्धेला सांगितली.

## ■ प्रश्न :

- त्या वृद्धेची प्रतिक्रिया काय होती?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- मुलगी जेव्हा परतली आणि तिने त्या वृद्धेला काय घडले, हे सांगितले, तेव्हा ती वृद्धा रागावली. ''मी वीस वर्षांपासून या माणसाला पोसतेय, म्हणून राग आला...'' ती उद्‌गारली, ''तुझ्या गरजा काय हे त्याने समजून घेण्याचा प्रयत्न केला नाही, तुझी चूक कुठे होतेय, हे समजावून सांगण्याचा प्रयत्न केला नाही. तुझ्या वासनेशी त्याने काय करायचे, हे समजणे समजा सोडून दे, पण इतक्या वर्षांच्या साधनेनंतर आणि इतक्या वर्षांच्या प्रार्थनेनंतर तरी त्याच्या मनामध्ये थोड्याशा करुणेचा उदय व्हायला हरकत नव्हती.''

- साधना (उच्च ध्येयप्राप्ती) आणि तपस् (अर्थात तपश्चर्या) या गोष्टी आत्मशुद्धीसाठी केल्या जाव्यात अशी अपेक्षा असते, आत्मप्रौढी किंवा अहंकार वाढवण्यासाठी नाही. या कथेमध्ये आत्मशुद्धी झालेल्या माणसाने त्या मुलीची वासना ओळखली. महत्त्वाची बाब ही आहे की तो त्या स्त्रीवर तिची वासना जाणून रागावला, त्यावरून हेच दिसून येते की तो हे सारे अहंकारासाठी किंवा आत्मप्रौढीसाठी करीत आहे. त्याच्या कृतीमध्ये हा अहंकार स्पष्टपणे दिसून येतो. प्रार्थना आणि साधना करणाऱ्या माणसाने कोणावरही कुठल्याच कारणासाठी रागावता कामा नये.

५

# आयुष्यात चमत्कार घडवा



व्ही. बेकमन हा त्याच्या कुटुंबासोबत एकदा कुठेतरी सहलीला गेला होता. त्याची कार जरा उतारावरच लावली गेली होती. त्याचा चार वर्षांचा मुलगा त्या कारजवळच खेळत होता. कुणास ठाऊक कसे, पण अचानक कार जागेवरून सरकली आणि त्याचा मुलगा अगदी गाडीच्या चाकाखालीच येण्याच्या बेतात होता. ते पाहून बेकमनने त्या अवजड कारची बाजू अचानक धरली आणि त्याच्या मुलाला वाचवण्यासाठी ती उचलून धरण्याचा प्रयत्न केला.

### ■ प्रश्न :

- तो मुलाला वाचवण्यास खरेच यशस्वी झाला का?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- मुलगा चाकाखाली सापडून काही दुर्घटना घडू नये म्हणून बेकमनने खरोखरच चमत्कार करीत ती कार पुरेशी उंच उचलून धरली.
- या घटनेच्या संदर्भामध्ये मला एक गोष्ट, जी स्वामी चिन्मयानंदांनी त्यांच्या 'लाईफ ॲन्ड मेडिटेशन' या पुस्तकांत सांगितली आहे, ती सांगण्याचा मोह होतोय. ''आता असा क्षणभर विचार करा की तुमच्या घराला आग लागली आहे, अशी बातमी तुमच्या कानावर पडली आहे. तुम्ही धावतच तिथे पोहचता आणि तुमचं घर आगीने वेढलेलं आहे, हे तुमच्या दृष्टीस पडते. अग्नीशामक दल अगदी असहाय आहे. अशा क्षणी तुमच्या दृष्टीस असं पडतंय की तुमची बायको तुमच्या मुलाला हातावर घेऊन बाहेर पडते आहे. तुम्ही चौकशी करता तेव्हा तुम्हाला एक चित्तथरारक बातमी कानावर पडते की तुमचा मुलगा वरच्या मजल्यावरच्या खोलीमध्ये शांतपणे झोपला होता. अचानक झालेल्या घटनेमुळे सगळ्यांची धावपळ चालू असताना, आईला मात्र आपल्या मुलाची आठवण येते. तो अग्नीशमन दलाचा जवान, चाळीस वर्षांचा त्याचा अनुभव असूनही म्हणतोय की, ''मां जी, आत

कोणताही माणूस जाऊ शकत नाही, कारणं सगळं काही आगीने वेढलेलं आहे.'' ती आई एका क्षणामध्ये सारं काही विसरते आणि वेड्यासारखी ओरडत त्या आगीतून धावत जाते. प्रत्येकाची अशी अपेक्षा असते की ती पार भाकरीसारखी करपून बाहेर पडणार. पण त्याऐवजी, त्यांच्या लक्षात असं येतं की तिची साडीही पेटलेली नाहीये. ती धावत त्या खोलीमध्ये गेली, त्या मुलाला उचललं आणि धावत बाहेर आली. या घटनेनंतर तिला फक्त पेटलेल्या शेकोटीजवळ जायला सांगा, ती घाबरते, तिची क्षमता पार संपलेली असते. पण मुलाच्या आत्यंतिक प्रेमाखातर, ती तो चमत्कार करु शकली. जर ही शक्ती माणसाच्या मनामध्ये आहे तर ती चोवीस तास ही तशीच एखाद्या वीरांगनेसारखी राहू शकणार नाही का? अजिबात नाही, कारण प्रेरणादायक असं कुठलंच उद्दिष्ट तिच्याजवळ नसते. म्हणून असं म्हणता येते की सर्वसाधारण माणूस हा भित्रा असू शकतो, पण जेव्हा त्याला मोठ्या उद्दिष्टाची प्रेरणा मिळते, तुम्हालाही तशी मिळू शकते, तेव्हा तो त्याच्या अंतरंगातून ऊर्जा आणि चेतनेचा एक प्रवाह उत्सर्जित करतो.

६

# वैवाहिक जीवनातील प्रश्न कसे सोडवावेत



एक वैवाहिक जीवनाचे समुपदेशन करणाऱ्या समुपदेशकाला नवरा आणि बायको यांच्यातील काही प्रश्नांबाबत आणि ते सोडवण्यासाठी आवश्यक अशा मार्गांबद्दल काही प्रश्न विचारण्यात आले. त्याने सांगितले ते असे, ''काही वेळा माझ्याकडे एखादा नवरा आणि बायको आपल्या जीवनसाथीबद्दल अगदी कटू अशा तक्रारी घेऊन येतात, तेव्हा मी त्यांना एकमेकांच्या बाबत कोणत्या विषयांवर तक्रार आहे, ते लिहायला सांगतो तसेच कोणते गुण स्तुती करण्याजोगे आहेत किंवा अजुनही स्तुती करता येऊ शकतात तेही लिहायला सांगतो. पण गंमत सांगायची म्हणजे, एखाद्याही गोष्टीबद्दल स्तुती करण्यास असमर्थ आहे, असा एकही तक्रारदार मला तरी अद्यापपर्यंत सापडला नाही. बऱ्याचदा ही साधीशी गोष्टही त्यांच्या संपूर्ण नातेसंबंधाला एक वेगळे वळण देऊन जाणारी ठरते. एका माणसाला मी हेच पुढेही जरा करण्यास सांगितले. त्या दिवशी सायंकाळी तो त्याच्या बायकोजवळ कागद आणि पेन्सिल घेऊन लिहायला बसला होता, तिच्याकडे तो सारखं सारखं वळून पाहायचा आणि मग लिहायचा. ''तुम्ही काय करीत आहात?'' तिने अखेरीस विचारले. ''तुझ्यात कोणकोणत्या गोष्टी चांगल्या आहेत, त्यांची यादी करीत आहे.'' '''चांगल्या गोष्टी..?'' तिने साशंकपणे विचारले, ''माझ्याजवळ काही चांगल्या गोष्टी आहेत, असं तुम्हाला वाटत असेल, असं मला वाटत नाही.'' ''ठिक आहे, तुला वाटतं तर वाटू दे...'' तो म्हणाला आणि आपलं लिहिणं चालूच ठेवलं. त्याने आपल्याविषयी काय काय लिहलिंय, हे जाणून घेण्याच्या उत्सुकतेने ती उठली आणि त्याला 'काय लिहिलंय, ते दाखवा', असं म्हणाली. आधी तो नाही म्हणाला, पण मागाहून राजी झाला. त्याने जे काही लिहिलं ते तिने अतिशय आश्चर्याने आणि आनंदाने वाचलं. ''का?'' कारण ती असं म्हणाली, ''माझ्यातील कुठल्या गोष्टीचा तुम्हाला आनंद होत असेल असं मला कधीच वाटलं नव्हतं.'' ''अनेक गोष्टींचा होतो, थोड्या काही गोष्टीचा नाही'' तो आनंदाने म्हणाला. ''छान'' ती म्हणाली,''जर असं असेल तर त्याचीही एक यादी कर.'' ती म्हणाली. ''करेन...'' तो म्हणाला ''पण तूही माझ्यासाठी तशीच यादी करणार असशील तर....''

## ■ प्रश्न :

- या कृतीमुळे काय साध्य झाले होते?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

■ **उत्तरे :**

- त्यामुळे झाले काय की त्यांच्या एकमेकांविषयी ज्या काही तक्रारी होत्या, ते त्या एकमेकांसमोर शांतपणे आणि सलोख्याने मांडू शकले. त्यामुळे त्यातील काही गोष्टीविषयीचा तिढा ते सहजपणे सोडवू शकले.
- वैवाहिक जीवनामध्ये जे प्रश्न निर्माण होतात, ते नेहमीच संवादाच्या अभावामुळे निर्माण होतात. जेव्हा जीवनसाथी अगदी प्रामाणिकपणे आपापल्या भावना एकमेकांसमोर मांडतात, तेव्हा सारे प्रश्न सहज सुटतात.

७

# अहंकारापेक्षा पश्चाताप केव्हाही चांगला



पूर्वेकडील एका सुलतानाची एक कथा आहे, जो रोज पहाटे ईश्वराची प्रार्थना करण्यासाठी उठायचा. एके दिवशी, तो रोजच्या प्रार्थनेच्या वेळेस जागा झालाच नाही. त्या दिवशी पहाटे सैतानाने त्याला उठवले आणि उठून प्रार्थना करण्याची आठवण करून दिली. ''तू कोण आहेस?'' सुलतानाने त्याला विचारलं. ''मी कोण आहे, याला काही फारसं महत्त्व नाही, कारण केलेली कृती चांगली आहे.'' ''होय, पण मला वाटते तू सैतान आहेस आणि तुझ्यासमोर नेहमीच काही वाईट हेतू असतात. मला फक्त एवढेच जाणून घ्यायचे आहे की तुला मला उठवावेसे का वाटले आणि मी प्रार्थना करावी, असे तुला का वाटले?'' ''ठिक आहे'', सैतान सांगू लागला...

## ■ प्रश्न :

- तो सैतान सुलतानाला काय म्हणाला?
- या कथेचे तात्पर्य काय?

## ■ उत्तरे :

- ''जर तू झोपून राहिलास आणि तुझी प्रार्थना करण्याचं विसरुन गेलास, तर तू त्यानंतर क्षमा मागशील आणि अशा पश्चातापाने देव जास्तच आनंदी होतो. पण तू जर असंच वागत राहिलास आणि पुढच्या दहा वर्षांमध्ये एकही प्रार्थना चुकवली नाहीस तर तू स्वत:च्याच कृत्याने खुश होशील, मग तू अहंकाररुपी पापाच्या गर्तेत पडशील आणि त्याचा मला जास्त आनंद होईल.'' सैतान म्हणाला.
- पश्चातापयुक्त चूक ही अहंकारी सद्गुणापेक्षा केव्हाही चांगली !

८

# एका शब्दामध्ये धर्माचं सारतत्त्व



एक राज्यपाल नेहमीप्रमाणे त्याच्या प्रवासाच्या मौजमजेत दंग होता. त्याच्या वाटेत असणाऱ्या एका मोठ्या महात्म्याच्या दर्शनासाठी आणि त्याला विनम्रपणे अभिवादन करण्यासाठी तो गेला. ''राज्यभराच्या कामकाजामुळे मला फार काही मोठं वाचन करता येत नाही. तेव्हा धर्माचं सारतत्त्व तुम्ही माझ्यासारख्या व्यस्त माणसासाठी एक किंवा दोन उताऱ्यामध्ये सांगू शकला काय?''

ते महात्मा म्हणाले, ''तुम्हाला सर्वोच्च ज्ञानाचा फायदा व्हावा म्हणून मी ते फक्त एका शब्दांतही सांगू शकतो.''

''अविश्वनीय ! तो असा वेगळा शब्द कोणता?'' राज्यपालाने विचारलं.

''शांती'', तो महात्मा म्हणाला.

''आणि शांतीचा मार्ग...?''

''ध्यान..''

''आणि मी विचारु शकतो का, ध्यान म्हणजे काय?''

महात्मा म्हणाले..

## ■ प्रश्न :

- महात्म्याने काय उत्तर दिले?
- या कथेचं तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- तो महात्मा पुन्हा उत्तरला, ''शांती...''

- शांतीचा इथे अर्थ आंतरिक आणि बाह्य शांती असा आहे. सर्वसाधारणपणे, लोकं ध्यानामध्ये बाह्य शांतता राखण्यात यशस्वी होतात. बाह्य शांतता तेव्हाच मिळते जेव्हा एखादा माणूस कोणाशीही बोलून किंवा लिहूनही संवाद साधणार नाही. ध्यानासाठी महत्त्वाची बाब आहे ती आंतरिक शांती प्राप्त करण्याची. दिवस आणि रात्र माणसाच्या मनामध्ये सतत संवाद सुरुच असतो. हा मनात सुरू असणारा आंतरिक संवाद थांबवणं हाच ध्यानाचा मुख्य उद्देश आहे. आंतरिक संवाद हा नेहमीच भूतकाळ किंवा भविष्यकाळाविषयी असतो. दिवसाच्या ठराविक वेळेमध्ये प्रत्येक गोष्टींना प्राप्त करण्याच्या इच्छेला थांबवण्याचे काम ध्यान करते. ध्यान म्हणजे आपल्या दैनंदिन आरडाओरड्यापासून आणि रडण्याभेकण्यापासून स्वत:ला स्थिर ठेवणे होय.

१

# कृतीसाठी विचार सर्वश्रेष्ठच



फोर्ड मोटर्समधील क्षमता तपासणारा एक तज्ज्ञ हेन्री फोर्डला आपला अहवाल सादर करीत होता. ''तुम्ही पाहालच सर, जो पुढे अहवाल येईल तो अत्यंत छान असेल, अपवाद असेल फक्त त्या माणसाचा जो कोपऱ्यात बसलेला आहे. केव्हाही मी त्याच्या जवळून जातो, तेव्हा तो टेबलावर पाय ठेवून निवांत बसलेलाच असतो. तुमचा पैसा तो निव्वळ वाया घालवत आहे.''

हेन्री फोर्ड फक्त हसले आणि ते जे काय बोलले तो त्या तज्ज्ञाला मिळालेला एक नवा पाठ होता.

## ■ प्रश्न :

- हेन्री फोर्डनी त्याला काय सांगितलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- फोर्ड म्हणाले, ''त्याच माणसाच्या डोक्यामध्ये एक कल्पना कधीकाळी आली होती जिने आपल्याला एवढी संपत्ती दिली आहे. त्यावेळीही, माझ्या आठवणीप्रमाणे त्या माणसाचे पाय तिथंच होते जिथं ते सध्या आहेत.''
- आपण या पृथ्वीवर आज जे काही पाहात आहोत, ती सर्व अशाच विचारांची निर्मिती आहे. विचार आणि कल्पनांनी जे काय बनवले आहे, तेच आजचे जग आहे. नवा आधुनिक सुविचार आहे, 'काम कौशल्याने करा, नुसते कठीण परिश्रम नकोत.' जर तुम्हाला कौशल्याने काम करायचे असेल, तर विचाराचा मार्ग धरा. मोजके काही लोकच विचार करतात. जे विचार करतात तेच काही तरी करून दाखवतात.

१०

# सकारात्मक प्रतिसाद द्या



कोणे एके काळी एक पाद्री होता, तो अतिशय धार्मिक होता आणि दुसऱ्याचे कधीही वाईट चिंतत नसे. एके दिवशी तो एका उपाहारगृहात बसून कॉफी पित होता, त्या दिवशी त्याचा उपवासाचा आणि संयमाचा दिवस असल्याने तो तेवढंच घेऊ शकत होता. त्याला त्याच्या जवळच्याच टेबलाजवळ बसून त्याच्याच धार्मिक सभेतला एक तरुण सदस्य मस्तपैकी मांसाहारावर ताव मारताना दिसला. ''फादर, मला वाटते, आज उपवासाचा दिवस आहे, हे तू विसरला असावास'', पाद्री म्हणाला.

''नाही, माझ्या ते चांगलं लक्षात आहे.''

''मग तू बहुधा आजारी असशील आणि डॉक्टरांनी तुला उपवास करण्यास मनाई केलेली असेल.''

''अजिबात नाही, माझ्या तब्येतीला काहीही झालेलं नाहीये.''

मग तो पाद्री आकाशाकडे बघत जे काही म्हणाला, त्यामुळे त्या तरुणाला जास्तच लाजीरवाणं झालं.

## ■ प्रश्न :

- तो पाद्री काय म्हणाला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- तो पाद्री देवाला म्हणाला, ''या तरुण पिढीचे आमच्यापुढे केवढे मोठे उदाहरण आहे. ते खोटं बोलण्यापेक्षा त्यांचं पाप सरळ मान्यच करून टाकतात, हे खरेच कौतुकास्पद नाही का?''
- आपण जेवढे धार्मिक तेवढाच प्रत्येक गोष्टीकडे बघण्याचा दृष्टीकोनही सकारात्मकच हवा. आपल्याला उत्तेजित करणाऱ्या घटना तर रोजच अवतीभवती घडत असतात. आपण त्याविषयी सकारात्मक प्रतिसाद दिला तर आपले व्यक्तिमत्त्वही सकारात्मक होते. याविरुद्ध, नकारात्मक

प्रतिसाद आपल्याला अनेक संकटात आणि प्रश्नांमध्ये नेऊन सोडतो. सकारात्मक विचार करणाऱ्याला हे जग हिरवेगार दिसते, तर नकारात्मक विचार करणाऱ्याला तेच काळे दिसते.

# ११

# इतरांच्या सेवेमध्ये समर्पित व्हा



काही वर्षांपूर्वी एक रब्बी (ज्यूंचा धर्मगुरु, जो त्यांचं प्रार्थनास्थळ सिनेगॉगचा प्रमुख असतो.) सब्बाथच्या जवळपास एक आठवडा आधीपासून ते सब्बाथच्या आधल्या सायंकाळपर्यंत कुठेतरी गायब व्हायचा. त्याच्या या विचित्र पद्धतीने गायब होण्यामुळे त्याची सारी धर्मसभा त्याचा संशय घेऊ लागली. त्यांनी ते रहस्य शोधून काढण्याचे ठरवले. त्यांनी त्यांच्यातल्याच एका सदस्याला त्याचा शोध घेण्यासाठी त्याच्या मागे लावून दिले. त्यांना संशय असा होता की तो गुपचूप त्या सर्वशक्तिमान देवाला भेटत असावा. हेच त्या माणसानेही पाहिले. त्या रब्बीने एका गरीब शेतकऱ्याचा वेष धारण केला होता आणि एका ज्यू नसलेल्या, अर्धांगवायूने पिडीत असलेल्या एका वृद्धेची त्याने सेवा केली होती, तिची झोपडी स्वच्छ करून दिली होती, तिच्यासाठी सब्बाथचे जेवणही तयार करून दिले होते.

जेव्हा तो हेर परतला, तेव्हा त्याला धर्मसभेकडून विचारण्यात आले, ''तर, तो रब्बी कुठे गेला होता? स्वर्गात गेला होता की काय?''

### ■ प्रश्न :

- त्या हेराने काय उत्तर दिले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- हेराने उत्तर दिले, ''नाही, स्वर्गापेक्षाही अधिक उंच तो गेला होता...''
- तुमचे आयुष्य इतरांच्या सेवेसाठी खर्च करा. प्रत्यक्ष स्वर्गामध्ये जाण्यापेक्षाही हे काम चांगले आणि उच्च आहे. या संदर्भात, राल्फ वाल्डो ट्राइनच्या कवितेच्या काही ओळी आहेत:

  ''तू श्रेष्ठत्वाचा शोध घेतोयस का, बंधो?

  तर लक्षात घे, ते संपूर्ण क्षणिक ऋतू आणि वर्षही हळूच संपतील...,

जर तू शोध घेत असशील फक्त स्वत:साठीच!

सत्य आणि स्थिर काय आहे, हे तू नाही सांगू शकणार,

पण जो असतो स्वत:ला विसरणारा, नियम जाणणारा,

तोच असतो एकटा नायक अन्

फक्त स्वत:साठी न मिळवणारा....!

त्याचाच इथं केला जातो सन्मान.

तेव्हा जा, घालवं आपलं आयुष्य इतरांच्या सेवेसाठी

आणि पहा, अपूर्व श्रेष्ठता आणि तेजस्विता लखलखेल स्वत:भोवती आणि मग,

तूच पोहचशील खूप उंच स्वर्गापेक्षाही जास्त...!

१२

# मुलंही हजरजवाबी असू शकतात



एका स्त्रीच्या घरी काही धार्मिक कार्यक्रम होता, आणि त्या निमित्ताने ती घरात लाडू बनवत होती. तिचा मुलगा, इतर छोट्या मुलांप्रमाणेच तोही जरा खोडकरच होता, स्वयंपाकघरातून मिठाई चोरून आणायचा. मग एकदा त्याच्या आईने त्याला चोरताना रंगेहात पकडलं, आणि त्याला देवघरातल्या देवाच्या मुर्तीसमोर उभं करून विचारलं, ''तू लाडू चोरत होतास, तेव्हा देव तिथंच होता, हे तुला माहिती आहे का?''

''होय'', मुलाने उत्तर दिलं.

''आणि तो सारखं तुझ्याचकडे पाहात होता, हे माहिताय?''

''होय'', मुलगा पुन्हा म्हणाला,

''आणि तो तुला काय म्हणत होता, असं तुला वाटतं?''

त्या बाळाने असं उत्तर दिलं की आईला हसूच फुटलं.

## ■ प्रश्न :

- मुलाचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- तो छोटा मुलगा म्हणाला, ''देव म्हणत होता की आता इथं फक्त आपण दोघेच जण आहोत, तेव्हा दोन लाडू घे.''
- तुम्हाला या विनोदाने हसू फुटलं असेल. पण मोठं सत्य हे आहे की आपल्यापैकी कुणीही देव पाहिलेला नाहीये. ती फक्त आपल्या मनामध्ये असणारी संकल्पना आहे. मुलं जे पाहतात किंवा ऐकतात, त्यावरच विश्वास ठेवतात. प्रत्यक्ष जे दिसतं, त्यापलीकडे ते समजून घेऊ शकत नाहीत. त्यांना सैतानाविषयी सांगणे, हे करु नकोस किंवा तेच कर म्हणून भीती दाखवणे आणि तशाच

गोष्टीसाठी त्यांना देवाविषयी दाखला देणे सारखेच आहे. ते अगदी न समजण्याइतके लहान असेपर्यंत तरी त्यांना देव किंवा सैतानाविषयी न सांगणेच श्रेयस्कर!

१३

# कृतीसाठी प्रेरणादायक



एक फ्रेन्च बिशप होता ज्याला वक्तृत्वाची नैसर्गिक देण होती. त्याला एकदा असंच कुणीसं विचारलं की त्याच्या गौरवार्थ वापरलं गेलेलं चांगलं वाक्य कोणतं?

बिशप म्हणाले, ''लोकं माझ्याकडे येतात आणि म्हणतात की तुमचं आजचं प्रवचन काय सुंदर झालं, तुम्ही किती चांगले व्याख्याते आहात, पण ही बाब माझ्यासाठी फार गौरवाची नसते. तर...''

### ■ प्रश्न :

- बिशप पुढे काय म्हणाले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- बिशप पुढे म्हणाले, ''सगळ्यात मोठी गौरवाची बाब तेव्हा असते जेव्हा एखादा माझ्याकडे येता आणि मला सांगतो की माझं धार्मिक प्रवचन ऐकून त्याला काहीतरी करण्याची प्रेरणा झालेली आहे.''
- चर्चच्या सेवेमध्ये धार्मिक प्रवचन देण्याचा मुख्य हेतू हाच असतो की लोकांनी त्यापासून प्रेरणा घेऊन चांगलं व्हावं आणि काहीतरी चांगलं करावं. या जगामध्ये सर्व पवित्र धर्मग्रंथांपेक्षाही जास्त कृतीतून व्यक्त होत असतं. जर असं होत नसेल, तर सगळी धार्मिक प्रवचनं म्हणजे केवळ एक उपचार होऊन बसतात.

१४

# चांगल्या वृद्धत्वासाठी तयारी करा



एक स्विस पत्रकार, ज्याने आयुष्यभर भरपूर परिश्रम केले होते आणि चांगलं काम केल्यामुळे भरपूर प्रसिद्धी आणि पैसाही मिळवला होता, त्याने निवृत्ती स्वीकारण्याचे ठरवले. त्याचं शेवटचं काम इटलीचे नवनिर्वाचित पंतप्रधान अल्सिड दे गॅस्परी यांची मुलाखत घेण्याचं होतं. जेव्हा मुलाखत घेण्याचं काम संपलं आणि दोघेही चहा घेण्यासाठी जरा निवांत बसले, सहज बोलता बोलता पत्रकार म्हणाले, ''ही माझी शेवटची मुलाखत आहे, मी आता पासष्ट वर्षांचा झालोय आणि आता निवृत्ती घेतोय.''

तेव्हा नवनिर्वाचित पंतप्रधान म्हणाले....

## ■ प्रश्न :

- नवनिर्वाचित पंतप्रधान काय म्हणाले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- पंतप्रधान म्हणाले, ''ओह! दुर्दैव. मी पण पासष्ट वर्षांचाच आहे, पण नव्या जबाबदारीच्या उंबरठ्यावर उभा आहे.''
- कुठलेही नवे काम करण्यासाठी वय हे काही अडथळा नसते. इतिहासामध्ये अशी खूप उदाहरणे आहेत की लोकांनी वयाच्या बऱ्याच उशीरा आपले काम सुरु केले आणि लवकरच बरेच काही प्राप्त केले. श्रील प्रभुपाद, जे 'आंतरराष्ट्रीय कृष्णभावनामृत संघा'चे संस्थापक आहेत, हे त्यापैकीच एक उदाहरण आहे. वयाच्या एकोणसत्तराव्या वर्षी ते भारतातून अमेरिकेमध्ये गेले. भारत सोडण्यापूर्वी, त्यांनी तीन पुस्तके लिहिलेली होती. पुढच्या बारा वर्षांमध्ये, त्यांनी जवळपास साठपेक्षा जास्त पुस्तके लिहिली. भारत सोडण्यापूर्वी, त्यांनी फक्त एका शिष्यावर अनुग्रह केला होता. पण पुढच्या बारा वर्षांमध्ये जवळपास चार हजार शिष्य झाले. अमेरिकेला जाण्यापूर्वी ते कधी परदेशातही गेले नव्हते. पण पुढच्या बारा वर्षांमध्ये, कृष्णभावनामृत संघाचा प्रसार करण्यासाठी ते अनेकवार जगभर फिरले.

**हे लक्षात घ्या :** त्यांच्या आध्यात्मिक ज्ञानप्राप्तीच्या अगदी शेवटच्या क्रान्तीकारी टप्प्यावर जरी त्यांचं असं कार्य झालेलं असलं तरीही ही बाब लक्षात घेण्यासारखी आहे की त्यांनी त्यांच्या आयुष्यात जे कमावलं, त्याची तयारी म्हणजे त्यांच्या आयुष्यातील एकोणसत्तर वर्षे होती.

१५

# क्षमेने स्वत:ची सुटका करा



संकटकाळी कामी येणारा मित्र हाच खरोखर नेहमीचा मित्र बनतो, असं नेहमीच सांगितलं जातं. नाझीच्या छळ छावणीमध्ये राहून आलेला एकजण आपल्या एका मित्राला भेटायला आला, जो त्याच्यासोबत काही काळ या दिव्यातून जात होता. काही वेळ एकमेकांची थट्टामस्करी झाल्यानंतर, दोघेही जण आपापल्या वैयक्तिक आयुष्याविषयी बोलत राहिले, आणि त्यावेळी एक दुसऱ्याला म्हणाला, ''असो, मी अद्यापही त्या गोष्टीतून बाहेर निघाली नाहीये, अद्यापही नाझींबद्दल माझ्या मनामध्ये द्वेष आहेच.''

## ■ प्रश्न :

- त्यावर दुसरा काय म्हणाला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ''म्हणजे'', दुसरा मित्र म्हणाला, ''याचा अर्थ त्यांनी अजुनही तुला तुरुंगातच डांबून ठेवलंय.''
- द्वेषामुळे बंधन येते. क्षमेने सुटका होते. एकदा का शत्रूला क्षमा केली की तुमच्या मनाला शांती मिळते, आणि आपण बंधनातून मिळालेल्या सुटकेच्या एका अशा स्तरावर पोहचतो, जिथं आपण आपल्या क्षमतेचा जास्तीतजास्त वापर करु शकतो. द्वेषामुळे तणाव वाढतो, आणि मानसिक ताण वाढतो, ज्यामुळे आपली क्रियाशीलता कमी होते.

१६

## चिकाटीला आपला जीवलग मित्र बनवा



गिलबर्ट बेकर हा देवावर विश्वास ठेवणारा एक सैनिक होता ज्याने एका पवित्र भूमीची यात्रा केली होती. केवळ दुर्दैव म्हणा, त्याला एका भटक्या अरबाने कैदी म्हणून पकडून नेले होते, आणि त्याला जवळपास शेवटपर्यंत लपवूनच ठेवले होते. त्या अरबाला एक सुंदर मुलगी होती आणि तिच्याच मदतीने तो लंडनला पळून आला. पण ती काही गिलबर्टला विसरु शकली नाही. एके रात्री, आपले हरवलेले प्रेम शोधण्यासाठी तिने वडिलांचे घर सोडले आणि ती लंडनला आली. लंडन तिला पूर्णपणे अनोळखी होतं आणि मुख्य म्हणजे तिला इंग्रजीचा एक शब्दही येत नव्हता. यावर कडी म्हणजे तिला गिलबर्टच्या घराचा पत्ताही ठाऊक नव्हता. हे सारं लक्षात येऊन ती रडली, पण गिलबर्ट... गिलबर्ट... गिलबर्ट... असा आवाज देत ती लंडनच्या रस्त्यारस्त्यांवर फिरु लागली. दिवस आणि महिने गेले, पण काही चांगले घडले नाही. पण तिने पहिल्यापेक्षा जास्त ठामपणे आपलं काम सुरु ठेवलं. हळूहळू, साऱ्या लंडनभर तिचा तो शब्द पसरला आणि गिलबर्टच्याही कानावर गेला. ते ऐकून गिलबर्ट...

### ■ प्रश्न :

- गिलबर्टने काय केले असावे, असे तुम्हाला वाटते?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- ते ऐकून तिच्या त्या खऱ्या प्रेमामुळे त्याच्या मनावर खोल परिणाम झाला आणि त्याने तिच्याशी लग्नं केलं.
- तिची चिकाटीच मोठी होती. चिकाटीच्या साहायाने, तुम्ही जवळपास सगळ्याच गोष्टी प्राप्त करु शकता. सततच्या प्रयत्नाने तुम्ही आपले दुर्गुणही दूर सारु शकता आणि सद्गुणांचा विकास करु शकता. जर तुम्ही सततच एखाद्या गोष्टीसाठी प्रयत्न करीत असाल तर कुठलीही गोष्ट प्राप्त करणे तुमच्यासाठी अशक्य नाही. जगामध्ये ज्यांनी बरंच काही मोठं प्राप्त केलं आहे, त्यांच्यामध्ये चिकाटी हा मोठा सद्गुणच आहे. ''जर तुम्हाला आयुष्यात यशच मिळवायचे असेल, तर चिकाटीला

आपला जिवलग मित्र बनवा, अनुभवाला तुमचा सल्लागार बनवा, सावधगिरीला तुमचा लहान भाऊ माना आणि आशेला तुमची पालनपोषण करणारी देवता माना.''

- जोसेफ ॲडिसन

१७

# आदरसत्कारी बना, दुसऱ्याचे हृदय जिंका



अध्यक्ष लिंकन हे त्यांच्या आदरसत्कार करणाऱ्या आणि स्वागतशील स्वभावाबद्दल जगभर तसे प्रसिद्धच होते. ते कधी लोकांमध्ये भेदभाव करीत नव्हते. एकदा, ते एका अधिकाऱ्यासोबत भटकत असताना ते एका कृष्णवर्णीय भिकाऱ्याला भेटले, जो त्यांना अगदी आदराने भेटला. अध्यक्षांनी लगेच प्रत्युत्तर म्हणून आपली डोक्यावरची हॅट काढून त्याला देऊन टाकली. त्या अधिकाऱ्याने त्यांना आश्चर्याने विचारलं, ''तुम्ही तुमची हॅट या अशा अडाणी माणसाला का बरे देऊन टाकलीत?'' यावर स्मित करीत अध्यक्षांनी उत्तर दिलं...

## ■ प्रश्न :

- अध्यक्षांचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- अध्यक्ष म्हणाले, ''माझ्यापेक्षा दुसरा कोणी मोठा आदरसत्कार करणारा होऊ नये, असं मला वाटतं.''
- आदरसत्काराचा स्वभाव सर्वांची हृदये जिंकतो. जिथं नम्रता असते, तिथं आदरसत्कार, स्वागतशीलता फुलून येते. नम्रता हा संतांचा गुण असतो. आपल्या दैनंदिन जीवनातही एखादा या सद्गुणाचा सराव सहजपणे करु शकतो.

## १८

# जीवंत असतानाच द्या



एक डुक्कर कायमच आपल्या प्रसिद्ध नसण्याबद्दल शोक करीत असे. तो त्याच्या मैत्रिणीकडे, म्हणजे गायीकडे जात असे आणि कुरकूर करीत असे की लोकं नेहमीच गायीबद्दलच चांगलं बोलतात पण आजपर्यंत तरी त्याच्याबद्दल कुणी एखादा चांगला शब्द बोलल्याचं ऐकण्यात नाही. हे खरं आहे की गाय दुध देते आणि त्यावर लोणीही मिळतं, पण त्याच्यामते डुक्कर अजुनही बरंच काही देतं, माणसांना त्याच्यामुळे बेकन आणि हॅम मिळतात आणि ब्रश तयार करण्यासाठी त्याचे केसही वापरले जातात. त्याने गाईला लोकं आपली स्तुती का करीत नाही, याचं कारण विचारलं. गाईने क्षणभर विचार केला आणि म्हणाली...

## ■ प्रश्न :

- गाईचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- गाय म्हणाली, ''कदाचित ते असं ही असू शकतं की मी ते सारं जीवंत असतानाच देते, पण तू फक्त मेल्यानंतरच देऊ शकतोस.''
- काही माणसं आयुष्यभर जे काय कमावलं आहे, त्याचा उपभोग न घेताच संपत्ती जमवत राहतात. ते भविष्यासाठी आणि म्हातारपणासाठी कमवत असतात. मृत्यू हा अनिश्चित असतो, तो केव्हाही कोणालाही घेऊन जाऊ शकतो. तेव्हा जमवलेली संपत्ती ही त्या माणसासाठी निरुपयोगी ठरु शकते ज्याने कुठलाही अपव्यय न करता ती जमवलेली आहे. तेव्हा थोडाफार खर्च करणे आणि शक्य तेवढे दान करणे. तुम्ही जीवंत असतानाच दान करुन त्याचा आनंद मिळवा.

१९

# तुमच्या निर्णयाबद्दल ठाम राहा



एके शनिवारी, श्रीयुत गिरार्ड, जे फिलाडेल्फियामधी एक करोडपती आणि नास्तिकही होते त्यांनी त्यांच्याकडे काम करणाऱ्या सगळ्या कारकुनांना बोलावून घेतले आणि दुसऱ्या दिवशी येऊन नवं काम पूर्ण करण्याबद्दल आज्ञा केली.

एक तरुण कारकून मात्र हळूवारपणे म्हणाला, ''श्रीयुत गिरार्ड, मी रविवारी काम करु शकत नाही''

''तुला आपल्याकडचा नियम माहिती आहे ना?'' श्रीयुत गिरार्ड यांनी विचारलं.

''होय, मला माहिती आहे, पण मी रविवारी काम करु शकत नाही.''

''ठिक आहे, मग जा आणि हिशेबनीसाकडून आपला हिशेब करून घे, ते पैसे तुला भावी काळासाठी उपयोगी ठरतील.''

एके दिवशी, कोणी एक स्वत:ची बँक असलेला गिरार्डकडे आला आणि त्याच्या बँकेमध्ये नव्या हिशेबनीसाच्या पदासाठी कोणी चांगला माणूस असल्यास सांगण्याची विनंती करु लागला.

### ■ प्रश्न :

- बँकेतल्या त्या पदासाठी गिरार्ड यांनी कोणाचं नाव सुचवलं असावं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- गिरार्ड यांनी त्या पदासाठी त्यांनी तडकाफडकी काढून टाकलेल्या तरुणाचं नाव सुचवलं.
- गिरार्ड यांनी जरी त्या तरुणाला कामावरून काढून टाकलेलं असलं, तरीही त्यांनी त्या माणसाचं अस्सल चारित्र्य ओळखलं होतं. सत्यासाठी जो माणूस स्वत:च्या हिताचा ही त्याग करु शकतो, तोच एक प्रामाणिक, विश्वासार्ह हिशेबनीस बनू शकतो.

## २०

# आध्यात्मिक प्रगतीसाठी सर्व गोष्टींचा त्याग करा



सुमेध नावाचा एक अतिशय अभ्यासू शिष्य होता, जो आध्यात्मिकता, धार्मिकता म्हणजे काय हे जाणण्याचा खूप प्रयत्न करीत होता. तो अनेक ग्रंथ वाचायचा, दूर दूरपर्यंत प्रवास करायचा, अनेक ध्यानाच्या वर्गामध्ये स्वत:चं नांव नोंदवायचा, पण त्याच्या परिश्रमाला काहीही फळ मिळत नव्हतं. सरतेशेवटी, तो एका मठाच्या धर्मगुरुंसोबत साधना करु लागला आणि सुमेध प्रत्येक महिन्याला आपल्या प्रगतीचा अहवाल त्यांना पाठवायचा. पहिल्या महिन्यांत त्याने लिहिले ''माझ्या चेतनेचा विस्तार होतोय आणि या विश्वाशी मी तादात्म्य पावतोय, असा मला अनुभव येतोय.'' गुरुंनी तो कागद फेकून दिला. दुसऱ्या महिन्यात त्याने लिहिलं, ''मी सरतेशेवटी हे शोधून काढलंच की शिष्यत्व प्रत्येक गोष्टीमध्ये असते.'' गुरु खूपच नाराज झाले. तिसऱ्या महिन्यात त्याने लिहिले, ''एकत्व आणि अनेकत्व याचं रहस्य माझ्या एकाग्रतेसमोर प्रकट झालंय.'' गुरुंनी कंटाळून जांभया दिल्या. पुढच्या महिन्याच्या प्रगतीमध्ये त्याने लिहिलं, ''कुणीही जन्मत नसते, कोणीही जगत नसते आणि कुणीही मरत नसते.'' गुरुंनी हताश होऊन हात उडवले.

त्यानंतर जवळपास वर्षभर गुरुंना त्याच्याकडून काहीही कळले नाही आणि सरतेशेवटी, गुरुंनीच त्याला प्रगती कळवण्याबद्दल पत्र लिहिलं. यावेळी त्याने जे कळवलं, ते वाचून गुरु आनंदाने नाचू लागले.

### ■ प्रश्न :

- सुमेधने काय लिहिलं होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- त्याने लिहिले, ''त्याचा कोण विचार करतंय?''
- आध्यामिक प्रगती ही तुम्ही काय शिकलात किंवा तुम्ही काय नवं शोधून काढलं, यावर अवलंबून नसते, तर तुम्ही कसे स्वत:ला सगळ्या गोष्टींपासून दूर सारु शकता आणि भौतिक जगातील आनंद आणि खोटी आशा यांचा त्याग करुन कसे राहू शकता, यावर ते अवलंबून आहे.

२१

# निसर्गात शोधण्यासारखं बरंच काही आहे



एका प्रॉटेस्टंट पंथीय बिशपने त्यांच्या चर्चमार्फत चालणाऱ्या एका शाळेला ठरल्याप्रमाणे वार्षिक भेट दिली. ते तिथं बऱ्याच दिवसांनंतर आल्यामुळे त्यांनी तिथंच मुक्काम करण्याचं ठरवलं. रात्रीचं जेवण झाल्यानंतर ते शाळेच्या प्राचार्यांसोबत गप्पा मारत होते. चर्चा चालू असताना बिशप म्हणाले, ''माणसाने निसर्गाचे कोडे बऱ्याच बाबतीत सोडवले आहे आणि बऱ्याच महत्त्वपूर्ण गोष्टी समाजासाठी शोधून काढल्या आहेत. पण मला नाही वाटत अजून काही तो पुढे शोधू शकेल. मला असं वाटते की आता या संदर्भात जग जवळपास संपत आलेलं आहे.''

प्राचार्यांना हे पटत नव्हते, ''माणूस अजूनही नवनवे शोधून काढण्याच्या मार्गावरच आहे. पुढच्या पन्नास वर्षांमध्ये कदाचित या विश्वात अनेक नव्या गोष्टींचा शोध लागेल.''

''तुम्ही एखाद्या गोष्टीचं उदाहरण देऊ शकाल?'' बिशपनी आव्हान दिलं.

''अं, माणूस कदाचित लवकरच उडणंही शिकेल.'' प्राचार्य म्हणाले.

''मूर्खपणा आहे हा..'' बिशप म्हणाले, ''जर मानवाने उडावं असं देवाला वाटलं असतं, तर त्याने त्याला खात्रीने पंख दिले असते. पण त्याने फक्त ते पक्षी आणि किटकांनाच दिले आहेत, कारण त्यांनी उडावं असं त्याला वाटतं, आणि माणसाने उडू नये असं त्याला वाटतं.''

## ■ प्रश्न :

- तुम्हाला त्या बिशपचं नाव माहिती आहे का?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- त्या बिशपचं नाव 'राईट' होतं. त्याला ऑरव्हिल आणि बिलबुट या नावाची दोन मुले होती. त्यांनी विमान बनवून मानवाच्या इतिहासामध्ये आपलं नाव लिहिलं.
- सकारात्मकता आणि दूरदृष्टी या दोन्हीमुळे तंत्रज्ञानामध्ये नवे शोध लागणं शक्य होतं. या विश्वामध्ये अनेक गोष्टी अजून तशाच उलगडायच्या राहिलेल्या आहेत. सतत संशोधन आणि कठीण परिश्रम

या दोन्हीच्या साहायाने माणूस निसर्गातील अनेक कोडी सहजपणे उलगडू शकतो. आणि एकेक शोध एकामागोमाग येऊ शकतात. तथापि, तो या साऱ्या शोधांचा आणि संशोधनांचा उपयोग या जगातील प्रत्येक माणसाच्या जीवनाला अर्थ प्राप्त करून देण्यासाठी करु शकतो.

# २२

# सहानुभूतीने बोला



पैशांचा अपहार केलेला एक कैदी आपली तीन वर्षांची शिक्षा भोगल्यानंतर इंग्लंडमधल्या डार्लिंग्टनच्या तुरुंगातून सुटला.

एके दिवशी रस्त्याने जाताना त्याला मेयर जॉन मॉरेल यांच्या जवळून जायची वेळ आली. गोंधळलेला, आणि जे काय नुकतंच झालं होतं त्यामुळे असा बदनाम झालेला असल्यामुळे त्याला मेयरसाहेबांना तोंड दाखवण्याची इच्छा नव्हती, आणि त्यामुळे तो आपलं लक्षच नाही असं दाखवत तो तिथून निघाला. तो घाईघाईने तिथून जवळून निघून जाण्याचा प्रयत्न करीत होता. पण अचानक त्याचा थरथरणारा हात कोणी तरी स्नेहाने धरला. मेयर त्याच्याशी अतिशय प्रेमाने आणि दयाळू स्वरात बोलले, ''हॅलो! अरे, तुला पाहून मला आनंद झाला. कसा आहेस?'' नेमकं काय घडतंय, हे त्यालाही कळेना, त्यांचं बोलणं लगेच संपलं.

काही वर्षानंतर, जे. एच. जोवेट यांनी लिहिलेल्या कथेनुसार, मॉरेल यांची त्याच माणसाशी दुसऱ्या एका शहरात भेट झाली. आता तो तरुण कैदी एक मोठा सद्गृहस्थ बनला होता. त्याने स्वत: मेयर साहेबांना थांबवले, त्यांच्या नजरेला नजर भिडवून तो म्हणाला, ''सर, मी तुरुंगातून सुटल्यानंतर तुम्ही माझ्यासोबत जसे वागलात, त्याबद्दल मला तुमचे आयुष्यभर आभार मानायला हवेत.''

''असं मी काय केलं?'' मेयरांनी आश्चर्याने विचारलं.

## ■ प्रश्न :

- कैद्याचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ''मी जेव्हा गुन्हा केला आणि साऱ्या जगाने माझ्याकडे पाठ फिरवली, तेव्हा तुम्हीच प्रथम मला माणूस समजून माझा स्वीकार केला. जेव्हा माझं म्हणावं असं कुणी मला जवळचं नव्हतं, तेव्हा

तुम्ही माझा हात धरलात. आज मी जे काही आहे, ते केवळ त्या दिवसामुळे आहे, त्या दिवशी तुम्ही माझ्याशी चार शब्द सहानुभूतीने बोललात. त्यामुळे माझं आयुष्य खरोखरच बदललं आणि तुमच्या व्यतिरिक्त असा कुणीही नाही, ज्याचे मी यासाठी आभार मानू.'' तो माणूस म्हणाला.

- एक सहानुभूतीचा शब्द, एक दयेने मारलेली मिठी आणि एक स्मित हास्य ही एखाद्याचं आयुष्य पूर्णपणे कायमसाठीच बदलून टाकू शकते आणि बराच बदलही पडतो. दुसऱ्याच्या आयुष्यामध्ये एवढा बदलही करण्याची शक्ती आपल्यामध्ये आहे. शक्यतो अशी शक्ती कायमच लोकांसाठी वापरता यावी, यासाठी प्रार्थना करुयात.

२३

# मूर्खासारखं पैसा वाचवण्याचा प्रयत्न करू नका



एका माणसाला न्यायाधीशांसमोर लाच घेण्याच्या आरोपावरून आणण्यात आलं. न्यायाधीशांनी त्याला कोणती शिक्षा भोगायची, हे त्यालाच निवडायला सांगितलं. एक तर पाच किलो कांदे खा, किंवा पन्नास फटके कोरड्याचे मारले जातील, किंवा एक हजार रुपये दंड भर. तो लोभी कैदी त्याचा पैसा खर्च करायला तयारच नव्हता, त्यामुळे त्याने तो पर्याय अर्थातच टाळला. जर पन्नास फटके कोरड्याचे खावेत, तर ते पूर्ण होईपर्यंत जीवंत राहणार नाही, हे नक्की! त्यामुळे त्याने कांदे खाण्याची शिक्षा निवडली. पण दोनपेक्षा जास्त कांदे त्याला खाता येईना, म्हणून त्याने ती शिक्षा अर्धीच सोडली. पण जेव्हा कोरड्याचे फटके बसू लागले तेव्हा दहा फटके बसेपर्यंतच तो ती चिरून जाणारी वेदना सहन करू शकला, मग रडू लागला. ''मला वाचवा, मी वाटल्यास दंड भरतो, वाटल्यास तुम्ही म्हणाले तेवढे भरतो.'' अशा रीतीने त्या मूर्ख माणसाने काही पैसा वाचवण्यासाठी तीनही शिक्षांची चव पाहिली.

### ■ प्रश्न :

- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- काही लोकं पैशांना अतिशय महत्त्व देतात आणि जीवनाच्या काही महत्त्वाच्या भागांकडे लक्ष देत नाहीत. पैसा हे काही आयुष्यात सर्वस्व असू शकत नाही. पैसा तुम्हाला उत्तेजना विकत घेऊन देऊ शकतो, पण आनंद विकत घेऊ शकत नाही. पैसा तुम्हाला ब्युटीपार्लरमध्ये घेऊन जाऊ शकतो, पण सौंदर्य नाही देऊ शकत. पैसा औषध आणून देऊ शकतो, पण पूर्णपणे आरोग्य नाही. तुम्हाला कसरत करण्यासाठी चांगली उपकरणं आणून देऊ शकतो, पण तुम्हाला चांगली शारीरिक क्षमता नाही मिळू शकत. तुम्ही एक चांगलं अन्त्यवस्त्र विकत घेऊन शकता, पण याची तुम्हाला खात्री नाहीच देता येणार की तुम्हाला चांगला आणि शांततेने मृत्यू येईल.

# २४

# देवावर विश्वास ठेवा पण स्वत:चे भले करा



एक धर्मगुरु टेबलाजवळ बसून आपल्या पुढच्या प्रवचनाची तयारी करीत होते, अचानक त्यांना कशाचा तरी स्फोट झाला आहे, असा आवाज आला. काही क्षणांतच घाबरलेलं लोकं रस्त्याने इकडून तिकडे पळताना दिसू लागले. गावातले धरण फुटले होते आणि नदीचं पाणी गावामध्ये वेगाने शिरत होतं. अर्थात गावातल्या लोकांना तिथून हलवणं चालू होतं. धर्मगुरुने पाहिलं की पाणी रस्त्यावरही जमा होऊ लागलेले आहे. सरतेशेवटी, तो ही एक माणूस होता आणि त्यालाही आतून एक भयाची लहर कापून गेली. पण त्याने जरा विचार केला, ''मी इथं बसून पुढच्या प्रवचनाची तयारी करतोय. कदाचित देवाला माझा त्याच्यावर किती विश्वास आहे, हे तपासून पाहायचे असावे. मी जे काही व्याख्यानामध्ये सांगतो, तेच मी व्यवहारातही आणावे, याचीच संधी त्याने मला कदाचित दिली असावी. मी काही इतर माणसांसारखा पळून जाणार नाही, पण इथंच बसून राहील आणि देव मला वाचवेल, असा विश्वास ठेवेन.''

या क्षणापर्यंत पाणी पार खिडकीपर्यंत पोहचलं होतं. माणसांनी भरलेली नाव ही नजरेच्या समोर आली. ''फादर उडी मारा'', ते ओरडले.

''नाही माझ्या बाळांनो'', फादर आत्मविश्वासाने म्हणाले, ''देव माझी काळजी घेणार, यावर माझा ठाम विश्वास आहे.'' त्या धर्मगुरुंनी वेड्यासारखी घराच्या छपरावर उडी मारली. पाणी तिथं पोहचायलाही काही फारसा वेळ लागला नाही. पुन्हा एक मोठी नाव त्या छताजवळून चाललेली होती, त्यातल्या लोकांनीही त्यांना विनंती केली. पण त्यांनी नकार दिला.

पाणी गुडघ्यापर्यंत आले, तेव्हा एका अधिकाऱ्याला त्यांच्या सुटकेसाठी मोटारबोट घेऊन पाठवण्यात आले, ''नको, आभारी आहे'' फादर त्याला म्हणाले, ''माझा देवावर विश्वास आहे. तुम्ही पाहाल, तो मला कधी मरू देणार नाही.'' अर्थातच फादर बुडून मरण पावले आणि स्वर्गात गेले. त्यांनी सर्वप्रथम काम कोणतं केलं तर ते देवाकडे गेले आणि तक्रार करु लागले, ''मी तुझ्यावर विश्वास ठेवला होता. तू मला वाचवण्यासाठी काहीच कसे केले नाही?'' ''सांगतो'', देव म्हणाला...

**■ प्रश्न :**

- देव त्या धर्मगुरुंना काय म्हणाला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ''मी तुला वाचवण्यासाठी तीन नावा पाठवल्या होत्या, आठवलं?''
- देव असाच आपल्याकडे स्वत:हून येईल, आणि आपल्याला कधीतरी वाचवेल, अशी अपेक्षा करणंच फार चुकीचं आहे. ते काम आपण आपल्याकडे घ्यायला हवं आणि आपण आपला जीव वाचवायला हवा. मग देव बाकीची मदत करेलच. आपण कारण आणि त्याचे परिणाम यावर विश्वास ठेवायला हवा. देवावर विश्वास ठेवा आणि त्याने ज्या परिस्थितीमध्ये आपल्याला ठेवलंय, त्यामध्येच जास्तीतजास्त चांगलं काम करण्याचा प्रयत्नही करा. ती म्हण आहे ना, ''देव त्यांनाच मदत करतो, जी माणसे स्वत:ला मदत करतात.''

## २५

# विनोदबुद्धीच्या मदतीने लोकांची मने जिंका



अमेरिकेचे अध्यक्ष यांना एका पत्रकार परिषदेमध्ये त्यांच्या आयुष्यातील सगळ्यात मजेदार प्रसंगाबद्दल सांगण्याची विनंती पत्रकारांनी केली. अध्यक्ष रुझवेल्ट यांना ही घटना सांगण्यास नेहमीच मजा यायची. गंमत अशी की, जेव्हा अध्यक्ष रुझवेल्ट न्यूयॉर्कचे पोलिस महासंचालक होते, त्यांच्यावर एका आयरिश माणसाची पोलिस या पदासाठी मुलाखत घेण्याची वेळ आली होती. रुझवेल्ट यांनी त्या उमेदवाराला विचारलं की दंगल करणाऱ्या घोळक्याला तिथून पळवण्यासाठी तू काय करशील? त्या उमेदवाराने तात्काळ असं उत्तर दिलं की त्याला फक्त नोकरीच मिळाली असं नाही, तर त्याच्या हजरजबाबीपणाबद्दल त्याला बक्षीसही मिळालं.

**■ प्रश्न :**
- त्या उमेदवाराचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय होते?

**■ उत्तरे :**
- त्या उमेदवाराने उत्तर दिलं, ''मी माझी हॅट घेऊन लोकांना वर्गणी मागायला सुरुवात करेन.''
- विनोदाची बुद्धी माणसाचं आयुष्य जगण्यायोग्य बनवते. तुम्ही जर कोणाला हसवू शकत असाल तरच लोकं तुमच्या भोवताली जमतील.

२६

# वैज्ञानिक संशोधन करणं ही पण एक प्रार्थनाच!



एकदा पिअरी क्यूरी जे एक मोठे फ्रेंच शास्त्रज्ञ होते, ते त्यांच्या प्रयोगशाळेमध्ये आपल्या सूक्ष्मदर्शक यंत्रातून काही तरी पाहात बसले होते. ते दृश्य असं दिसत होतं जणू पिअरी देवाची वाकून प्रार्थना करीत आहेत. त्याचक्षणी त्यांचा एक विद्यार्थी त्यांना भेटण्यासाठी प्रयोगशाळेत आला. ते प्रार्थना करीत आहेत, असं वाटून तो गुपचूप बाहेर निघून चालला. त्याचवेळी पिअरी क्यूरी यांनी आपलं डोकं वर उचललं आणि त्या विद्यार्थ्याला आवाज दिला. त्या विद्यार्थ्याने म्हटलं, ''सर, तुम्ही प्रार्थना करीत होता, म्हणून मला तुमच्या प्रार्थनेमध्ये व्यत्यय आणावासा वाटला नाही.''

त्या महान शास्त्रज्ञाने उत्तर दिलं....

**■ प्रश्न :**

- त्या शास्त्रज्ञांनी काय उत्तर दिलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- ते म्हणाले, ''मुला, अरे काम करणं म्हणजे एक प्रकारची पूजाच नाही का? हीच एकमेव प्रार्थना आहे, ज्या मार्गाने आपण स्वत: चालत त्याच्याकडे जात असतो. याच मार्गाने परमेश्वर त्याची चिरंतन सत्ये प्रकट करतो. आपण जेव्हा हे संशोधनाचं काम अगदी आदराने करतो, आपण परमेश्वराच्या अनेक गूढ सत्याजवळ येऊन थांबतो.
- हे विश्व अनेक आश्चर्य आणि गूढांमुळे झाकलेले आहे. शास्त्रज्ञ संशोधनाच्या साहायाने आपण विश्वातील अनेक रहस्ये प्रकट करीत आहोत, ज्यामुळे मानवजात एक पाऊल पुढे जात आहे.

# २७

# संयमाच्या सद्गुणाची जोपासना करा



सर आयझॅक न्यूटन यांच्याकडे एक अतिशय छान पण बराच खोडकर असा कुत्रा होता, ज्याचं नाव होतं डायमंड. एके रात्री न्यूटन जेव्हा घरी नव्हते, त्या कुत्र्याने मेणबत्तीवर एक फटका मारला, ज्यामुळे तिथं टेबलावर ठेवलेल्या पुस्तकाच्या हस्तलिखिताला आग लागली; आणि काही क्षणातच ते पुस्तक म्हणजे अर्धवट जळालेलं असं बाड राहिलं. ते लिहित असलेलं हे पुस्तक म्हणजे त्यांच्या आठ वर्षांच्या कठीण संशोधनाचं आणि परिश्रमाचं फलित होतं. पण जेव्हा न्यूटन परतले आणि त्यांनी ती दुर्घटना पाहिली, त्यांची त्याबद्दल प्रतिक्रिया अशी होती...

## ■ प्रश्न :

- न्यूटन यांची प्रतिक्रिया काय होती?
- या कथेचे तात्पर्य काय?

## ■ उत्तरे :

- सर आयझॅक न्यूटन यांनी त्या कुत्र्याला जवळ बोलावले आणि म्हटले, ''डायमंड, तू तुझ्या मालकाला कोणत्या संकटात आणि कामात ढकलले, याची तुला थोडी तरी जाणीव आहे का?'' मग त्यांनी आता हे नष्टच झाले आहे, तर काय करायचे, असा विचार बहुसंख्य लोकांप्रमाणे केला नाही. ते शांतपणे टेबलाजवळ बसले आणि त्यांनी पुन्हा लिहून काढायला सुरुवात केली.
- संयम आणि सहनशीलता हीच यशाची गुरुकिल्ली होय. जो माणूस भावनेने संतापतो, तो माणूस योग्य दृष्टिकोनातून सगळ्या गोष्टीकडे बघू शकत नाही. दुसऱ्या बाजूने विचार करता, जी व्यक्ती तो किंवा ती आपल्या भावनिक आयुष्यावर नियंत्रण ठेवते, तीच व्यक्ती आपल्या बुद्धीमत्तेचा पूर्णपणे वापर करु शकते. अशा व्यक्ती कठीण परिस्थितीतही स्थिर बुद्धीने विचार करतात आणि सहजासहजी संतापत नाही. त्यामुळेच तो किंवा ती त्यांच्या आदर्शांशी अगदी वास्तववादी सुसंगती ठेवू शकतात.

## २८

# संपत्तीचा संचय करण्याचं रहस्य शिका



एक श्रीमंत असा शेतकरी होता ज्याच्याकडे कैक एकर शेती होती, आणि बँकेमध्येही बरेच पैसे साठवलेले होते. प्रचंड परिश्रम आणि निर्णयशक्ती यांच्या साहायाने त्याने त्याच्या आयुष्यामध्ये भरपूर संपत्ती कमावली होती. अनेक लोकांचा प्रेरणादायक म्हणून तो अतिशय प्रसिद्ध होता. एकदा एक पत्रकार आपल्या वर्तमानपत्रासाठी त्याच्यावर लेख लिहून लोकांना परिचय करून द्यावा म्हणून त्याच्याकडे मुलाखत घ्यायला गेला. ''सर, आम्हाला आपलं नाव आणि आपली प्रसिद्धी यांचं रहस्य ऐकायला आवडेल. पण तत्पूर्वी तुम्ही एवढी संपत्ती कशी काय जमवली हे वाचकांना सांगाल काय?''

त्या उत्सुक पत्रकाराला ते रहस्य उलगडून सांगण्यासाठी त्या शेतकऱ्याला एक वाक्यही लागलं नाही.

**■ प्रश्न :**

- त्या शेतकऱ्याचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय?

**■ उत्तरे :**

- ''ती फार मोठी कथा आहे. पण सुरुवातीला आपण एक लहानशी गोष्ट समजून घेऊ. तुम्ही हे काही दिवे का विझवून टाकत नाही, तेवढीच विजेची बचत होईल?'' शेतकरी म्हणाला.
- जो कुणी त्याच्या परिश्रमाने आणि कठोर कष्टाने संपत्ती कमावतो, तो त्याच्या प्रत्येक पैशाचं मूल्य जाणतो. ते जे काय कमावतो, त्यातला प्रत्येक पैसा ते वाचवतात. ते बचतीच्या बाबतीत अत्यंत दक्ष असे असतात, आणि ते कुठे पैसा वाया तर घालवत नाही ना, याकडे कटाक्षाने लक्ष ठेवतात. ते जे काय बचत करतात, ते पुन्हा व्यवसायामध्ये गुंतवतात, आणि मग ती संपत्ती चांगल्या पद्धतीने वाढत जाते.

## २९

# शांतता म्हणजे काय?



एका गावाच्या बाहेर एक प्रसिद्ध असा मठ होता. त्या मठाचे मठपती हे त्यांच्या ज्ञानाच्या आणि हुशारीच्या बाबतीत अतिशय प्रसिद्ध होते. त्यांच्या प्रसिद्धीमुळे लोकांचा लोंढा आपल्या पूजनीय मठपतीबद्दल आदर व्यक्त करण्यासाठी तिथं येत असे. दुर्दैवाने, या गर्दीमुळे त्या मठाची शांतता आणि एकांत यांचा भंग होत असे. शिष्यांना अतिशय त्रास होत असे, पण मठपती असलेले गुरु मात्र त्या गर्दीतही तसेच निवांत असत, जसे ते एकांतात राहात.

या गोष्टीला विरोध करणाऱ्या शिष्याला उत्तर देताना गुरु म्हणाले...

**■ प्रश्न :**

- गुरु आपल्या शिष्याला काय म्हणाले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- ''शांतता म्हणजे फक्त ध्वनीचा अभाव नव्हे, तर शांतता म्हणजे 'मी' चा अभाव!'' गुरु म्हणाले.
- ''मी'' म्हणजे कुणा एकाची स्वत:च्या 'अस्तित्वाची' जाणीव होय. त्यामध्ये पूर्ण आयुष्यभरामध्ये काय विचार केला आहे, काय जाणवलं आहे, आणि काय कर्म केले आहे याची नोंदच असते. एका माणसाचं पूर्णपणे असणं म्हणजे त्याचं स्वत्व होय. त्यात त्याचे प्रश्न, यातना, आनंद, दु:ख वगैरे सारं काही असतंच. पण ध्यानाची अवस्था ही कुणाला अशी दुसऱ्या कशानेही प्राप्त होतच नसते, तर या स्वला बाजूला ठेवण्याच्या कलेनेच प्राप्त होते. हे म्हणजे अंगावरचे अलंकार बाजूला काढून शांत बसण्यासारखं आहे. ही अवस्था म्हणजे विचार, इच्छाआकांक्षा आणि वासनारहित मनाचं असणं आहे. अशी शांतता... अर्थात मौन म्हणजे विचाररहित अवस्था होय, फक्त जगाचेच विचार नाही तर स्वचेही विचार नसणं म्हणजे शांतता किंवा मौन!

## ३०

# तत्त्वांशी प्रामाणिक रहा



राष्ट्रपिता महात्मा गांधी यांना १९३१ सालच्या ब्रिटनमधील गोलमेज परिषदेसाठी बोलावण्यात आले होते. तेव्हा महात्माजींनी नेहमीप्रमाणे कमरेला एक पंचा गुंडाळला होता आणि ते तसेच परिषदेसाठी गेले. गोलमेज परिषदेच्या सदस्यांना तर त्यांचा असा पोशाख पाहून धक्काच बसला आणि त्यावर बरीच चर्चाही झाली. त्यामुळे महात्मा गांधींचा ब्रिटीशांकडून बराच उपहास झाला, त्यांना चिडवण्यात आलं आणि अपमानही करण्यात आला, पण त्यामुळे त्यांचा आत्मविश्वास काही कमी झाला नाही आणि त्यांची शांत वृत्तीही चळली नाही. पत्रकार परिषदेच्या वेळी ब्रिटीश पत्रकार त्यांच्यावर त्याविषयी हल्ला करण्यासाठी अगदी टपून बसले होते. पण, त्यांना जे काही उत्तर मिळालं, ते पुढच्या काळामध्येही त्यांच्याकडून विसरलं जाणं शक्यच नव्हतं. महत्त्वाचा भाग म्हणजे, दुसऱ्या दिवशी तिथल्या सगळ्या मोठ्या वृत्तपत्रामध्ये ही बातमी अगदी पहिल्या पानावर होती.

### ■ प्रश्न :

- गांधीजीनी त्यांच्या या पोशाखाबद्दल काय उत्तर दिलं होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- गांधीजीनी उत्तर दिलं होतं, ''तुम्ही चार कपडे जास्त घालता आणि मी चार कमी घालतो.''
- सामाजिक सभ्यतेच्या संकेतांना न सोडता गांधीजींनी जे उत्तर देण्याचा ठामपणा दाखवला होता, तो निर्विवादपणे श्रेष्ठ होता. त्यांचं उत्तर म्हणजे जगाला हे सांगण्याचा एक प्रयत्न होता की त्यांनी कसा पोशाख करावा यावर तरी त्यांच्यावर कोणी हुकूमत दाखवू शकत नाही. त्यांनी ज्या पद्धतीने उत्तर दिले त्यावरून त्यांची विनोदबुद्धी आणि सारासार विवेकबुद्धीची खात्री वाटते.

३१

# तुम्ही जे करता त्यात संपूर्ण समर्पण ठेवा



सूर्यकांत त्रिपाठी नावाचे एक प्रख्यात हिंदी साहित्यिक होते. ते 'निराला' या टोपणनावाने ओळखले जात होते, कारण त्यांच्या साऱ्या रचना याच नावाने प्रकाशित होत असत.

निरालांना लहान मुलांमध्ये खेळण्यास खूप आवडत असे. एके दिवशी ते भर रस्त्यावर मुलांसमवेत खेळत होते. काही लोकं ज्यांनी कधीच निरालांना पूर्वी पाहिलं नव्हतं, ते निरालांना भेटण्यासाठी त्याचवेळेस आले आणि त्यांनी प्रत्यक्ष निरालांनाच विचारलं, ''निरालांचं घर कोणतं हे माहिती आहे का?'' निराला त्यांना म्हणाले, ''जरा थांबा, मी तुम्हाला काही क्षणानंतर त्यांचं घर दाखवतो.'' त्यांनी पुढे खेळणं सुरु ठेवलं, आणि खेळ संपल्यानंतर त्यांनी त्यांना ओळख करुन दिली की तेच निराला आहेत. भेटायला येणारे आश्चर्यचकित झाले आणि त्यांनी विचारलं, ''आम्ही तुम्हाला विचारलं तेव्हाच तुम्ही हे का नाही सांगितलंत?''

निराला म्हणाले...

## ■ प्रश्न :

- निरालांनी काय उत्तर दिलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- निराला म्हणाले, ''त्यावेळी मी लेखक असलेला निराला नव्हतो, तर फक्त मित्रांसोबत खेळण्याचा अनुभव घेणारा एक मुलगा होतो.''
- परिस्थिती आणि वातावरण पाहून तुमच्या व्यक्तिमत्त्वामध्ये परिवर्तन करा. तुम्ही जेव्हा खेळत असता तेव्हा लहान बाळ बना. मुलं ही मोठ्यांपेक्षा जास्त सर्जनशील असतात. अंगी नम्रता बाणा आणि तुम्ही त्याच्या साहायाने आपली सर्जनशीलता वाढवा. जेव्हा आपण मोकळेपणाने मुलांमध्ये मिसळतो, आपण त्यांचे काही गुण सहज ग्रहण करु शकतो. मोठेपणा हा साधेपणा आणि नम्रता यामध्येच असतो. निराला हे मुलांसोबत खेळण्यात अतिशय गुंग झाले होते, त्यामुळे आपण मोठे

लेखक असल्याच्या अहंकाराकडे त्यांचे लक्ष ही नव्हते. हे तसं पाहिलं तर ध्यानाचं एक तंत्रच आहे.
ध्यान म्हणजे तुम्ही जे काय करीत आहात, त्यामध्ये स्वत:ला पूर्णपणे विसरुन जाणे.

## ३२

# प्रेम करा आणि मानवतेची सेवा करा



जागतिक दर्जाचा पॉप स्टार क्लिक रिचर्ड याला एकदा विचारण्यात आलं की त्याच्या आयुष्यातला अतिशय मर्मस्पर्शी प्रसंग कोणता? उत्तरादाखल त्याने बांगलादेशातील बिहारी निर्वासितांच्या छावणीला दिलेल्या भेटीची कहाणी आठवून सांगितली. ''पहिल्या दिवशी सकाळी,'' त्याने सांगितलं, ''मी माझे हात जवळपास एक डझनवेळा तरी धुतले असतील. तिथं असलेल्या अनेक माणसांना तर मला स्पर्श करण्याची इच्छा नव्हती. तिथल्या छावणीतील प्रत्येकजण, अगदी लहान मुलंही डोळे आलेले आणि अंगावरच्या खवड्यांच्या खपल्यांनी गच्च भरले होते. मी तिथं एका मुलाला खाली वाकवत होतो, तेही त्याचं चांगलं छायाचित्र त्या छायाचित्रकाराला घेता यावं म्हणून आणि त्याचवेळी त्याचा स्पर्शही होऊ नये म्हणून स्वत:ला जपत होतो, पण तेव्हा कुणीतरी त्या मुलाच्या बोटावरच उभं राहिलं तसं ते मूल वेदनेने कळवळून ओरडलं आणि मी...

### ■ प्रश्न :

- त्याची त्यावेळी काय प्रतिक्रिया होती?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- ते मूल वेदनेनं कळवळून ओरडलं आणि मी सारं काही विसरुन एक प्रतिक्रिया म्हणून त्या मुलाला उचलून जवळ घेतलं, अगदी त्याचं ते घाणेरडं शरीर आणि अंगावरच्या खवड्यांच्या जखमा विसरुन उचलून घेतलं. मला चांगलं आठवतं की त्याचं ते तापलेलं शरीर मला लगेच बिलगलं आणि त्याचं रडणं क्षणात थांबलं, त्या क्षणी, मला हे लक्षात आलं की प्रेमाविषयी अजून बरंच काही आपल्याला शिकायचं आहे; आणि मला आनंद याचा होता की किमान मी शिकायला सुरुवात तरी केली होती. माझा पांढरा पडलेला चेहरा आणि माझ्या कडेवरचं ते मूल असं ते छायाचित्र माझ्या मालकीच्या संपत्तीमधलं मोठं धन आहे. मी ते माझ्या झोपण्याच्या खोलीमध्ये आणि स्नानगृहामध्येही लावलं आहे, जिथं मी ते अगदी न विसरता पाहू शकतो.

- प्रेम हे जात, देश, पंथ आणि लिंगभेद यांच्या साऱ्या मर्यादा ओलांडून पुढे जातं. त्याला राष्ट्रीयत्व माहिती नसतं, आणि त्या व्यक्तीचं सामाजिक स्थान काय आहे, याकडेही प्रेम कधी पाहात नसतं. असे कुठलेही अडथळे गृहित न धरता आपल्याला आपलं प्रेम व्यक्त करता आलं पाहिजे. जगामध्ये कोणालाही असा एखादा आजार वा अपरिहार्य अशा अवस्थेमुळे खाली पाहण्याची वेळ येऊ नये. प्रेम, सुरक्षितता आणि मदत केल्यामुळे कोणालाही आत्यंतिक समाधान आणि आनंद प्राप्त होतो. प्रेम आणि सेवेचे आनंद हेच खरे फळ आहे.

३३

# आपण हळूहळू मरणाकडे जात आहोत, हे सत्य समजून घ्या



स्टुडिओमध्ये प्रवेश करता करता एका भल्या सकाळी कोणीतरी चार्लस् बॉयरला विचारलं की त्याला कसं वाटतंय? अगदी आनंदाने चार्लस् बॉयरने उत्तर दिलं, ''हळूवारपणे मरतोय...'' ज्या माणसाने हा प्रश्न विचारला होता, त्याला धक्काच बसला. तो पुढे त्याला म्हणाला, ''अरे, तुला झालंय तरी काय?'' बॉयर म्हणाला....

### ■ प्रश्न :

- चार्लस् बॉयरचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- ''मी जेव्हा जन्म घेतला त्याच दिवशी माझा मृत्यू सुरु झालाय.''
- मृत्यू ही मानवाच्या आयुष्यातील अगदी निश्चितपणे घडणारी बाब आहे, आणि असे असूनही ही एक गोष्ट अशी आहे जी स्वीकारणं कुणालाही कठीण वाटते. एक दिवस आपलं असणं संपणार आहे, यावर विश्वास ठेवणं अतिशय कठीण जातं. पण, हेही तितकंच सत्य आहे की आपला जन्म ज्या दिवशी होतो, त्याच दिवसापासून आपला मृत्यूकडे प्रवास सुरु झालेला असतो. जो माणूस हे महान सत्य स्वीकारतो, तो मृत्यूला काही घाबरत नाही.

## ३४

# प्रेम आणि आपुलकी यातून आपलं सौंदर्य व्यक्त करा



एक लहान मुलगी अब्राहम लिंकन, जे अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष होते, यांच्याबद्दल वाचत होती. ते कसे दिसत असावेत याबद्दल तिच्या मनामध्ये विचार आला आणि तिने तिच्या वडिलांना ते विचारलं. तिचे वडील म्हणाले, ''बाळ, अध्यक्ष लिंकन दिसायला फारसे चांगले नसलेले गृहस्थ आहेत.'' तिच्या डोक्यात त्याच्यामुळे त्यांची प्रतिमा तशीच राहिली, पण त्याचवेळी त्यांच्याबद्दल वर्तमानपत्रामध्ये जे काय चांगलं लिहून आलं होतं, ते ही तिच्या मनामध्ये तसंच ठासून राहिलं होतं. एके दिवशी, तिने फारच आग्रह केला म्हणून तिच्या वडिलांनी तिला अध्यक्ष लिंकन कसे आहेत, हे दाखवण्यासाठी व्हाईट हाऊसमध्ये नेले. लिंकननी तिला आपल्या मांडीवर घेतले आणि ते तिच्याशी नेहमीप्रमाणे आपल्या हळूवार आणि मार्दवयुक्त आवाजात बोलू लागले. अचानक त्या मुलीने आपल्या वडिलांना आवाज देऊन बोलावले आणि त्यांना काहीतरी म्हणाली.

### ■ प्रश्न :

- ती मुलगी आपल्या वडिलांना काय म्हणाली?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- त्या मुलीने आपल्या वडिलांना बोलावून म्हटले, ''बाबा, मी आजपर्यंत पाहिलेल्या सगळ्या व्यक्तीमध्ये हे सर्वांत सुंदर आहेत.''
- व्यक्तीचे काम आणि त्याचा स्वभाव यामुळे मधले सगळे अडथळे नाहिसे होतात. माणसाचे अस्सल गुण त्याच्या बाह्य व्यक्तिमत्त्वापेक्षाही मोठे ठरतात. आपण हे सारे माणसामध्ये शोधणे शिकले पाहिजे. एखादा माणूस रुबाबदार दिसतो, तो त्याच्या बाह्य व्यक्तिमत्त्वामुळे नव्हे, तर तो काय चांगली कर्मे करतो, त्यामुळे दिसतो. रुबाब म्हणजे रुबाबदार व्यक्तीने केलेले कार्य असते.

## ३८

# प्रेरणेचे तंत्र शिकून घ्या



एका मुकादमाने, ज्याच्या हाताखाली अगदी आळशी लोकांचाच जत्था कामाला दिला होता, त्याने एका लोखंडाच्या कारखान्याजवळ त्यांना दहा दहा फुटाचे खड्डे खणायचं काम सांगितलं. ते आळशी कामगार तेव्हा तर फारच संतापले जेव्हा त्यांना वेगळ्या वेगळ्या ठिकाणी ते खड्डे करायला सांगितलं गेलं. वेळ जसजसा जात होता तसतसे ते खणत गेले, पण सरतेशेवटी फक्त नऊच खड्डे खणू शकले. त्यांच्या हे लक्षात येत नव्हतं की त्या कारखान्याच्या बाजूला हे खड्डे त्यांना कशासाठी करायला सांगितले आहे. ते वैतागले, थकले आणि अतिशय चिडलेही. ते आता काम थांबवणार, तेवढ्यात त्या मुकादमाने अशी काही गोष्ट त्यांना सांगितली की ते सारा संताप आणि थकवा विसरून पुन्हा कामाला लागले.

### ■ प्रश्न :

- त्या मुकादमाने त्यांना काय सांगितलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- त्या मुकादमाने त्यांना असं सांगितलं की त्याला तो पाण्याचा फुटलेला पाईप हवा आहे, जो त्या कामगारांच्याच वस्तीला पाण्याचा पुरवठा करतोय. ते ऐकून ती माणसं पुन्हा कामाला आली.
- कुठलंही काम त्याच्यासमोर जर निश्चित उद्दिष्ट नसेल तर ते काम प्रेरणादायक होत नसून कंटाळवाणे होते. दुसऱ्या बाजूने विचार करता, जर एखाद्या माणसाला आपण जे काय काम करतोय त्यामागचा उद्देश माहिती असेल तर त्याचं लक्षही त्यावर केंद्रित राहतं, तो प्रामाणिकपणे आणि दक्षतेने काम करु शकतो. विशिष्ट उद्देश जर नसेल तर पूर्णपणे समर्पित होऊन कृती करणे जड जाते. दुसरी महत्वाची बाब यामध्ये आहे ती अशी की एखाद्या व्यक्तीला आपण जे काम करणार आहोत, त्यापासून काय मिळणार आहे, हे कळले तर त्याचा कामाचा उत्साह आपोआप वाढतो.

## ३६

# नाते कसे वाढवावे



एक मानसशास्त्राचा प्राध्यापक त्याच्या तज्ज्ञ असण्याबद्दल, सखोल ज्ञानाबद्दल आणि हुशारीबद्दल प्रसिद्ध होता. एकदा त्याच्या काही शिष्यांमध्ये काही तंटा निर्माण झाला. त्यांच्यामध्ये अतिशय कडाक्याचे भांडण झाले आणि बराच काळ एकमेकांविषयी द्वेष आणि शत्रूत्व निर्माण झालं. इतर काही विद्यार्थी महाविद्यालयामध्ये शांतता आणि प्रसन्नता कायम राहावी म्हणून चिंतेमध्ये होते. त्यातले काही लोकं या मानसशास्त्राच्या प्राध्यपकाकडे त्यावर काही उपाय आहे का हे विचारायला गेले. ते विद्यार्थ्यांमध्ये प्रेम आणि एक सलोख्याचं वातावरण तयार करु शकतील, असा सर्वांचा विश्वास होता. या तिरस्कार आणि एकमेकांवरच्या अविश्वासावर काही उपाय या प्राध्यापकांनी सुचवावा म्हणून त्यांनी त्यांना विनंती केली. प्राध्यापकांनी खालील उपाय सुचवला.

### ■ प्रश्न :

- प्राध्यापकांनी कोणता उपाय सुचवला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- प्राध्यापकांनी एक तंत्र सांगितले, ''जेव्हा केव्हा तुम्ही कोणासोबत असता किंवा तुम्ही कोणाचा विचार करावा, तेव्हा फक्त स्वत:शीच म्हणा, मी मरतोय आणि हा माणूसही मरतच आहे.'' या विश्वातलं हे सत्य समजून घेण्याचा जरा प्रयत्न करा. प्रत्येकजण असा विचार करण्यासाठी राजी असेल तर कसलाही कडवटपणा राहणार नाही, आणि सर्वांमध्ये एक समन्वयाचं वातावरण निर्माण होईल.''
- आपण एक न एक दिवस मरणार आहोत, असं कुणी अगदी मनापासून तरी स्वीकारणार नाही. तथापि, प्रत्येकाला हे माहिती आहे की त्याला एक न एक दिवस मरायचंच आहे, पण कुणाला असं वाटत नाही की तो खरंच मरणार आहे. जगातले सगळे प्रश्न हे स्वत:ला मरण येणारच नाही, या विचारामुळे निर्माण होतात. जो माणूस सतत स्वत:च्या मृत्यूचा विचर करेन किंवा स्मरण करेन,

तो कधीही तिरस्कार करणार नाही किंवा शत्रूत्वही निर्माण करणार नाही. 'मी एक दिवस मरणार आहे आणि इतर माणसं ही मरणाच्या दिशेनेच जात आहेत', हा विचार माणसाचं एका चांगल्या माणसामध्ये रुपांतरण करील. आणि तेव्हाच खऱ्या अर्थाने प्रेम निर्माण होईल.

## ३७

# गुणवत्तेने वर्णभेदाच्या पूर्वग्रहातून बाहेर या



एक लहान कृष्णवर्णीय मुलाने नेहमीच वर्णद्वेषामुळे होणारे अत्याचार पाहिले होते. (जातीय किंवा वांशीक उच्चनीचता) त्याचे कुटुंबीय, नातेवाईक आणि मित्रमंडळी यांना नेहमीच छळलं जायचं आणि त्यांच्या वर्णामुळे त्यांना त्रास दिला जायचा. तो एकदा गावच्या जत्रेमध्ये गेला आणि विविध, रंगीबेरंगी फुगे विकणाऱ्या माणसाजवळ जाऊन उभा राहिला. त्या फुगेवाल्याने लाल रंगाचा एक फुगा वेगळा केला आणि आकाशाकडे सोडला त्यामुळे बरेच मुलं त्याच्याकडे फुगे विकत घेण्यासाठी आले. मग त्याने निळा रंगाचा फुगा सोडला, मग पिवळ्या रंगाचा आणि एक पांढ्या रंगाचाही सोडला. ते सारे फुगे आकाशात पार दिसेनासे होईपर्यंत तरंगत होते. तो लहान मुलगा बराच वेळ त्यातला काळा फुगा पाहात उभा होता, आणि मग त्याने विचारलं, ''काका, हा काळा फुगाही इतर फुग्यांप्रमाणे आकाशात उडू शकतो का?''

### ■ प्रश्न :

- त्या फुगेवाल्याने काय उत्तर दिले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- ''होय बाळा. रंग नाही, तर त्या फुग्यामध्ये जे काही भरलं आहे ना तेच त्याला आकाशामध्ये उंच घेऊन जातं.''
- सामाजिक स्तरावरच्या संबंधामध्ये कातडीचा रंग हा मोठा भेद निर्माण करतो. वांशिक भेद मानणं, हा कोणत्याही काळामध्ये मोठं पाप आहे. जन्म आणि मरण हे सर्व माणसांना सारखं आहे, आणि सर्वांना सारखंच वागवलं गेलं पाहिजे; जात, वर्ण आणि संप्रदाय कितीही भिन्न असोत. जिथं गुणवत्ता असते तिथं वांशिक भेदाला काही जागा नाही.

## ३८

# वृथा परिश्रम असे काहीही नाही



थॉमस एडिसन विजेऱ्यामध्ये वापरायच्या शिसे या धातूला काही पर्याय आहे का यावर संशोधन करीत होते. त्यांनी त्या विषयावर अगदी खूप मेहनत घेऊन संशोधन केले आणि जवळपास १०,००० प्रयोग केले. पण, एकाही प्रयोगाचा उपयोग झाला नाही. एके दिवशी, त्यांच्या एका मित्राने त्यांना विचारले की या अशा वृथा परिश्रमाने ते नाउमेद होत नाही का? एडिसन यांच्या उत्तराने त्या माणसाच्या जीवनाला एक नवा आयाम मिळाला.

**■ प्रश्न :**

- एडिसन यांचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- एडिसन उत्तरले की, ''वृथा परिश्रम? हे प्रयोग काही वाया गेले नाहीत. किमान मला याचा तरी शोध लागलाच ना की विजेऱ्यांमध्ये कोणते दहा हजार धातू या शिश्याला पर्याय नाहीत.''
- कोणतंही काम लहान किंवा मोठं नसतं, मग सरतेशेवटी हाती काहीही येऊ दे. कामाच्या प्रत्येक गोष्टीकडे आपण त्याचा परिणाम काहीही असो, सकारात्मक प्रकाशात बघायला पाहिजे. एडिसननी परिश्रमाच्या बाबतीत काही तडजोड केली नाही, पण तरीही ते त्यांच्या अपयशाने खचून गेले नव्हते. लहानशा अपयशाकडे बघण्याचा तुमचा दृष्टिकोन जेव्हा तुम्ही बदलता, तुम्हाला त्याच मार्गावर किंवा दुसरीकडे यश मिळण्याची शक्यता निर्माण होते. यश असं अचानक किंवा काही तरी त्याच्या बदल्यात मोजल्याशिवाय सहजी मिळत नसतेच. ते बराच वेळ घेते, कठीण परिश्रमही मोजावे लागतात आणि मोठ्या गोष्टी साध्य करण्यासाठी दीर्घोद्योगाची मदत घ्यावी लागते.

३९

# कडक टिका कशी टाळाल?



एक प्रसिद्ध संगीतकार त्याच्यावर वारंवार होणाऱ्या कडक टिकेमुळे एकदा खूपच निराश झाला. तो जुना जाणता आणि अतिशय अनुभवी असल्यामुळे त्या कडक टिकेमुळे तो खूपच व्यथित झाला होता, आणि त्याचा सगळा आत्मविश्वास जातो की काय अशी परिस्थिती निर्माण झाली होती. तो त्याच्या गुरूकडे या विषयावर बोलण्यासाठी आणि काही सल्ला मिळतो का, हे पाहण्यासाठी गेला. तेव्हा गुरु म्हणाले, ''टिकाकार हे कुणाच्याही आयुष्यामध्ये एक महत्त्वाची भूमिका बजावतात. तुमचे मित्र जे कधीच सांगणार नाही, तेच नेमकं ते सांगतात. त्याला फार महत्त्व देऊ नका, पण तुमचं सादरीकरण कोणत्या का मार्गाने होईना, उत्तम कसं होईल, याकडे लक्ष द्या. जर त्यामुळे तुमच्या कामाची गुणवत्ता वाढणार असेल तर ते तुमच्या भल्यासाठीच हे करीत आहेत, असं समजा, होय ना?'' त्या गुरुंनी मग एक महत्त्वाची बाब त्या संगीतकाराला सांगितली.

## ■ प्रश्न :

- त्या संगीतकाराचं मन वळवण्यासाठी त्या गुरुंनी काय सांगितलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- गुरु म्हणाले, ''कुठल्याही टिकाकाराचा पुतळा कोणी सन्मानाने उभा करीत नसतात. पुतळे त्यांचेच उभे केले जातात जे टिकेतून तावून सुलाखून निघतात.''
- टिकेला उत्तर देण्याचा चांगला मार्ग म्हणजे काहीही न करणे, त्याला उत्तर न देणे आणि गप्प बसणे. जे समाजासाठी काही चांगलं करीत असतात, त्यांच्यावरच टिका केली जाते. जे काही करतात त्यांच्यावरच टिका केली जाते, जे काहीच करीत नाहीत त्यांच्यावर कुणीच टिका करीत नाही. बऱ्याचदा ज्यावर जास्त टिका होते, त्याचं योगदान फार मोठं असतं. त्यामुळे एखाद्याने असं टिकेने व्यथित होण्यामध्ये काहीही अर्थ नाही. त्याऐवजी त्याकडे रचनात्मक दृष्टिकोनातून पहा, ज्यामुळे तुमचाच विकास होण्यास मदत मिळेल.

## ४०

# कायद्याचा सन्मान करा



१९२३ मध्ये गांधीजी येरवडा कारागृहामध्ये आपली शिक्षा भोगत होते. त्यावेळी बाहेरून भेटायला येणाऱ्या लोकांना, त्यांच्या आप्तांना फक्त सायंकाळीच भेटता येत असे. एके दिवशी, कस्तुरबा त्यांना भेटण्यासाठी आल्या. कारागृहाच्या नियमानुसार आप्त त्या कैद्याशी फक्त मुख्याधिकाऱ्यांच्या उपस्थितीतच बोलू शकत असे. पण, गांधीजी फार मोठे नेते असल्यामुळे तो मुख्याधिकारी काही तिथं थांबला नाही.

जेव्हा परतण्याची वेळ संपली तेव्हा मुख्याधिकारी त्यांना सांगण्यासाठी आत आला. तेव्हा कस्तुरबा आणि गांधीजी दोघंही त्या भेटण्याच्या वेळेमध्ये एकही शब्द न बोलता अगदी पुतळ्यासारखे स्तब्ध उभे असलेले त्याला दिसले, त्याला धक्काच बसला.

''तुम्ही शांत का उभे राहिलात? काही अडचण आहे का?'' त्या मुख्याधिकाऱ्याने विचारलं.

गांधीजी उत्तरले...

### ■ प्रश्न :

- गांधीजीनी काय उत्तर दिलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- गांधीजी उत्तरले, ''मी या कारागृहाचे नियम चांगले जाणतो. मी माझ्यासोबत असणाऱ्या इतर कैद्यांपेक्षा काही वेगळा नाहीये. मग असं असेल तर, मला माझ्या पत्नीशी अगदी खासगीमध्ये बोलण्याची सवलत का मिळाली, जी इतरांना नाहीये? मला खात्री आहे, हे माझ्या पत्नीला पटेल कारण तिचाही समानाधिकारावर विश्वास आहे. तुम्ही गेल्यापासून आम्ही एकमेकांशी चकार शब्दही बोललेलो नाहीये, कारण तसं केलं असतं तर आम्ही कारागृहाचे नियम मोडले असं झालं असतं.''
- गांधीजींना महात्मा या कारणांसाठी म्हटलं गेलं आहे. त्यांनी त्यांच्या लोकप्रियतेचा कधीही फायदा घेतला नाही. त्यांनी सामान्य माणसांचेच नियम पाळले, आणि एक कायदा पाळणारी व्यक्ती

म्हणून ते राहिले. तो त्यांचा मोठेपणा होता.

## ४१

# तुमच्या मुलाची हिंमत वाढवा



एका दहा वर्षाच्या मुलाने गायक बनण्याचा ध्यास घेतला. एके दिवशी तो आवाजाच्या चाचणीसाठी गेला, पण त्याला नापास करण्यात आलं, आणि हे सांगण्यात आलं की त्याचा आवाज हा खिडकीच्या तावदानामधून भराभरा येणाऱ्या वाऱ्यासारखा नुसता वाजतो. त्याची आई, एका गरीब शेतकऱ्याची बायको होती, तिला आपल्या मुलाच्या अंगातील गुण चांगलेच माहिती होते, तिने मात्र त्याला धीर देत गायक बनण्याच्या दिशेने जोरदार प्रयत्न करायला सांगितले. केवळ सतत प्रेरणेमुळे आणि तिने आत्मविश्वास दिल्यामुळे तो मुलगा पुढे चालून आपल्या मधुर आवाजाच्या विश्वासावर जग जिंकू शकला. तो दुसरा तिसरा कुणी नसून मोठा गायक एनरिको कॅरुसो होय.

### ■ प्रश्न :

या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

आईवडिल मुलांच्या विकासामध्ये महत्वाची भूमिका निभावत असतात. आईवडिलांनी उच्चारलेला प्रत्येक शब्द हा मुलांच्या मनावर एक अमिट छाप पाडत असतो. त्यासंदर्भामध्ये पुढील कविता वाचण्यासारखी आहे.

''मूल जर टिकाटिप्पणीमध्ये वाढत असेल तर ते दोष देण्यास शिकेल.

मूल जर कलहात वाढत असेल तर ते लढायला शिकेल.

मुलाची जर टर उडवली जात असेल तर ते लाजाळू बनेल.

मुलाला जर लाजीरवाणं केलं जात असेल तर त्याला सतत अपराधी वाटेल.

मुलाला जर सतत सहन करायला लावलं तर ते सहनशील बनेल.

मुलाला जर सतत धीर दिला गेला तर ते हिंमतवान बनेल.

मुलाला जर स्तुती ऐकायला मिळाली तर तोही स्तुती करायला शिकेल.

मुलगा जर प्रामाणिक वातावरणात राहिला तर तो न्याय करणेही शिकेल.

मुलगा जर सुरक्षित वातावरणामध्ये राहिला तर त्याला विश्वासार्हता म्हणजे काय हे कळेल.

जर मुलाला कुणी स्वीकारत असेल तर तोही स्वत:वर प्रेम करायला शिकेल.

जर मूल स्वीकृती आणि मैत्रीपूर्ण वातावरणात राहात असेल तर त्यालाही या जगामध्ये प्रेम शोधण्याची सवय राहिल.''

- डोरोथी लॉ होल्ट.

## ४२

# खऱ्या नम्रतेला अंगी बाणवा



एक गाजलेला शल्यतज्ज्ञ शस्त्रक्रिया करायला जाण्यापूर्वी प्रार्थना करताना एका परिचारिकेला दिसला. त्याला शस्त्रक्रियेमध्ये मदत करणारी ती नर्स आश्चर्यचकित होऊन म्हणाली, ''डॉक्टर, मला वाटलं होतं की शल्यतज्ज्ञ फक्त त्यांच्या स्वत:च्या क्षमतेवरच विश्वास ठेवतात.'' शल्यतज्ज्ञ म्हणाले....

**■ प्रश्न :**

- त्या शल्यतज्ज्ञांचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- शल्यतज्ज्ञ म्हणाले, ''एक शल्यतज्ज्ञ हाही एक माणूसच असतो. तो स्वत:हून काही चमत्कार म्हणून करु शकत नाही. माणसाच्या निव्वळ बुद्धीमत्तेपेक्षा आणि त्याच्या कौशल्यापेक्षा बळकट अजून काही नसतं तर मला खात्री आहे विज्ञानाने एवढी प्रगती कधीही केली नसती. मी प्रत्येक शस्त्रक्रियेच्या आधी जेव्हा प्रार्थना करतो, तेव्हा मी त्या दैवी शक्तीच्या अगदी जवळ पोहचतो, आणि मला वाटते तीच शक्ती प्रत्येक शस्त्रक्रियेच्या वेळी मला मार्गदर्शन करते.
- डॉ. ॲलेक्स कॅरेल यांनी त्यांच्या 'मॅन, द अननोन' या पुस्तकामध्ये प्रार्थनेची शक्ती काय असते, याचे वर्णन केले आहे. ते म्हणतात, 'प्रार्थना ही आपण उत्सर्जित करीत असलेली सर्वात मोठी ऊर्जा असते. ती गुरुत्वाकर्षण शक्तीप्रमाणेच एक मोठी शक्ती असते. एक डॉक्टर या नात्याने मी अनेकदा पाहिले आहे की मृत्यूच्या दारामध्ये उभी असलेली माणसंही केवळ प्रार्थनेच्या जोरावर पुन्हा उभी राहिलेली आहेत. प्रार्थनेच्या प्रामाणिक बळावर ती माणसं असाध्य जुनाट आजारांनी नीट झालेली मी पाहिली आहेत. प्रार्थना ही रेडियमसारखी प्रकाशमान स्वशक्तीने उत्सर्जित होणारी ही सर्व ऊर्जेच्या अमर्याद साठ्यातून येणारी असते. जेव्हा आपण प्रार्थना करतो, तेव्हा विश्वातील चिरंतन, शाश्वत अशा ऊर्जेशी आपण जोडले जातो.

४३

# एक पाऊल पुढे चला



सिनेमाच्या थिएटरमध्ये काम करणारा एक सफाई कामगार त्याच्या कामाच्या बाबतीत अतिशय तत्पर, वेळेवर काम करणारा आणि त्याचं काम मन लावून करणारा असा होता. तो फक्त त्याचंच काम करीत असे असं नाही, तर थिएटरच्या सुरक्षेसाठीही तो काम करीत असे.

बऱ्याचवेळा व्यवस्थापक आणि सहव्यवस्थापकही त्याला त्यांची कामं सोपवत असत, आणि ते स्वत: कामातून सुटका करून घेत असत. तो सफाई कामगार त्यांचं कामही अत्यंत चोख बजावत असे आणि त्याला कराव्या लागणाऱ्या या जास्तीच्या कामाबद्दल तो कधीही कुरकूर करीत नसे. एकवेळा, त्या थिएटरचा मालक अचानक भेट देण्यासाठी आला आणि त्याने व्यवस्थापक आणि सहव्यवस्थापक तिथं कामावर नसतानाही हे सारं काम एवढं कुणी केलं, हे विचारलं. तेव्हा तो सफाई कामगार म्हणाला...

## ■ प्रश्न :

- त्या सफाई कामगाराचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ''मी बघतो ना, सर'' तो सफाई कामगार म्हणाला. त्याचं उत्तर ऐकून त्या सफाई कामगाराला ताबडतोब त्या थिएटरचा नवा व्यवस्थापक बनवण्यात आला.
- जगात जे काहीतरी करून दाखवतात, अशांची गरज असते. तुम्ही जेव्हा काहीतरी करून दाखवता, तेव्हा तुमची जात काय, तुमचा पंथ काय, तुमचा वर्ण कोणता किंवा अगदीच सांगायचं झालं तर तुमची शैक्षणिक पात्रता काय आहे, याचा विचार न करता तुमचा स्वीकार समाज करतो. समर्पण अणि स्वत:ला झोकवून देऊन काम करणाऱ्याच्या शोधातच जग आहे, आणि तुमच्या आयुष्यात यशस्वी होण्यासाठी तुम्ही एक पाऊल पुढे जाऊन वेगळं काम करून दाखवा.

४४

# एकमेकांविषयी काळजी व्यक्त करा



दोघं भाऊ, ज्यांच्यापैकी एक अविवाहित होता आणि दुसऱ्याचं लग्न झालेलं होतं, त्यांच्या मालकीच्या शेतामध्ये भरपूर धान्य पिकलं होतं. ते दोघेही भाऊ शेतातून घरी धान्य नेण्यापूर्वी त्याचे दोन सारखे वाटे करीत असत. अर्ध धान्य एका भावाकडे जात असे आणि अर्ध धान्य दुसऱ्या भावाकडे नेलं जात असे. सुरुवातीला हे अगदी व्यवस्थित चालू होतं. नंतर मात्र बऱ्याचवेळा लग्न झालेला भाऊ विचार करीत असे, ''हे काही योग्य नाही. माझ्या भावाचं तर लग्न झालेलं नाही, आणि शेतातलं अर्ध धान्य तो घरी घेऊन जातो. इकडं माझं तर लग्न झालेलं आहे, बायको आणि तीन मुलं आहेत. माझ्या म्हातारपणाची मी पूर्ण सुरक्षा केलेली आहे. पण म्हातारपणी माझ्या बिचाऱ्या या भावाची कोण काळजी घेईल? तो आज जेवढी भविष्यासाठी तरतूद करतोय. त्यापेक्षा जास्त त्याने करायला पाहिजे, म्हणून तेवढ्यासाठी का होईना, त्याला माझ्यापेक्षा जास्त धान्याची गरज आहे.''

त्याच्या मनामध्ये हा विचार आल्याबरोबर तो अंथरुणावर उठून बसला, आपल्या भावाच्या घरी गेला आणि भावाच्या धान्याच्या पोत्यामध्ये एक पोत अजून टाकून आला.

इकडे अविवाहितही झोपेतून जागा होऊन बसला होता, आणि विचार करु लागा होता, ''हे खरेच योग्य नाही. माझ्या भावाला बायको आहे आणि घरात तीन मुलं आहेत, शिवाय मला खात्री आहे की त्याला जेवढं धान्य मिळतं, ते त्याला नक्कीच पुरत नसणार. मला काही माझ्या भावासारखे पुढे कोणी वारस नाही आणि सरतेशेवटी, एका माणसाला धान्य असे कितीसे लागणार? माझ्या भावाला नक्कीच माझ्यापेक्षा जास्त धान्याची गरज आहे.''

विचार येताच तो लगेच अंथरुणावरुन उठला आणि त्यानेही धान्याचे एक पोते आपल्या भावाच्या गव्हाणीत नेऊन टाकले.

पण गंमत अशी झाली की एके दिवशी ते दोघे असेच एकमेकांच्या घरी धान्याचे पोते टाकायला गेले आणि एकमेकांवर आदळले आणि तात्काळ मेले. त्यांच्या मृत्यूनंतर बऱ्याच वर्षांनंतर ही कथा सर्वांना समजली. गावातल्या नागरिकांनी त्या दोघांना जिथं मृत्यू आला होता त्या जागेवर एक मंदिर बांधलं.

### ■ प्रश्न :

- त्यांनी नेमकी कोणती जागा मंदिरासाठी निवडली?

- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- त्यांनी त्या दोघा भावांना जिथं मृत्यू आला तीच जागा मंदिरासाठी निवडली, त्यांनी दुसरी जागा निवडली नाही कारण त्यांच्या शहरामध्ये ती जागा सर्वात पवित्र होती.
- आत्यंतिक प्रेम हे सरतेशेवटी त्यागच व्यक्त करते. प्रेम म्हणजे दुसरं काही नसून स्वत:ला पूर्णपणे विसरणं आहे.

## ४५

# आत्मत्यागातून आनंद मिळवा



रॉबर्ट ली जो दोस्त राष्ट्रांच्या सैन्याचा एक मोठा नेता होता, तो एकदा काही सैनिक आणि अधिकाऱ्यांसोबत आगगाडीतून जात होता. आगगाडी जेव्हा एका स्थानकावर थांबली, एक गरीब बाई त्यांच्या डब्यामध्ये शिरली. तिथं बसण्यासाठी एकही जागा नव्हती आणि कोणालाही तिला बसण्यासाठी जागा देणं काही गरजेचं वाटत नव्हतं. रॉबर्ट लीने तिला पाहीपर्यंत आणि तिला स्वत:ची जागा बसायला देईपर्यंत तरी तिला उभं राहणं गरजेचंच होतं. त्यानंतर एका क्षणात त्या डब्यातले सगळेच उभे राहिले आणि त्याला बसायला जागा देऊ लागले. पण ली मात्र त्या सगळ्यांना लाज वाटावी म्हणून उभाच राहिला.

**■ प्रश्न :**

- त्याने साऱ्या अधिकाऱ्यांना आणि सैनिकांना काय म्हटलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- तो म्हणाला, ''नाही मित्रांनो, तुमच्यापैकी जर कुणी त्या गरीब बाईला बसायला जागा देऊ शकत नाही, तर मलाही तुमच्याकडून अशी जागा घेता येणार नाही.''
- नम्रता आणि औदार्य हे दोन गुण रॉबर्ट लीचे वाखाणण्यासारखे होते. स्वत:चं सुख नाकारण्यातून आणि आपलं सुख दुसऱ्यांना देण्यातूनच खरा चिरस्थायी आनंद मिळू शकतो. व्यक्तीच्या सामाजिक स्तरावर चांगलं कृत्य करणं हे अजिबात अवलंबून नसतं.

४६

# सराव, सराव, सराव...



होलमन हंट जो एक प्रसिद्ध चित्रकार... 'लाईट ऑफ द वर्ल्ड' या चित्राचा चित्रकार. त्याच्या चित्राची स्तुती करणाऱ्या एकाने त्याला एकदा अगदी कशाचाही वापर न करता नुसत्या हाताने वर्तुळ कसे काय काढता याचं तंत्र विचारलं. त्याचं रहस्य सांगण्यासाठी त्या चित्रकाराने त्याची एक गुरुकिल्ली सांगितली. तो म्हणाला...

**■ प्रश्न :**

- हॉलमनने कोणतं रहस्य उघड केलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- तो म्हणाला, ''फार सोपं आहे. हे सारं करण्यासाठी रोज आठ तास याप्रमाणे फक्त चाळीस वर्ष सराव करायचा.''
- सरावामुळे बिनचूकपणा येतो. हे जरा विचित्र वाटेल पण खात्रीने यश देणारा हा मंत्र आहे की सराव करा. सराव चालू ठेवा.

४७

# प्रार्थना तुम्हाला देवाच्या जवळ नेते



बादशहा अकबराच्या साम्राज्यामध्ये एकमेकांवर प्रेम करणारं एक गरीब शेतकऱ्याचं जोडपं होतं. एके दिवशी दुर्दैवाने तो शेतकरी खूपच आजारी पडला. सगळ्या वैद्यांनी प्रयत्नांची पराकाष्ठा केली, आणि मग मात्र त्याच्या बायकोला जे काय होईल, ते ऐकण्याची मानसिक तयारी करायला सांगितलं. आता कोणी त्यांच्यासाठी काही करु शकेल अशी परिस्थिती राहिलेली नव्हती, तेव्हा हृदयामध्ये एक आशेचा किरण घेऊन आणि आपल्या आत्मशक्तीच्या जोरावर त्या स्त्रीने अल्लाचं दार ठोठावण्याचं ठरवलं. तिने मशीदीमध्ये जाऊन तिथं त्या सर्व विश्व निर्माण करणाऱ्या परमेश्वराच्या समोर गुडघे टेकण्याचं ठरवलं. मग आपल्या फाटक्या बुरख्याने आपले डोके झाकून घेत मान खाली घालून आपल्या नवऱ्याचं स्मित करणारं चित्र मनात ठेवून आणि नजरेसमोर अल्लाहला ठेवून ती मशीदीकडे निघाली. तिच्या भावना अगदी ओथंबून आल्या होत्या आणि तिला दुसरं कुणी डोळ्यासमोर दिसतही नव्हतं आणि मनातही दुसरा विचार येत नव्हता. तशा अवस्थेत मशीदीकडे जाताना ती साक्षात् बादशहा अकबरालाच जाऊन धडकली आणि अडखळली जो तिथं नमाज पडण्यासाठी बसला होता. अचानक धक्का बसलेला आणि संतापलेला अकबर तिच्यावर ओरडला आणि त्याचा हात तिला जणू मारण्यासाठी वर गेला. ती शांत स्त्री त्याच्याकडे बघू लागली आणि न घाबरता म्हणाली...

## ■ प्रश्न :

- ती बादशहाला काय म्हणाली?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ती स्त्री म्हणाली, "जहांपहनाह, मी माझ्या नवऱ्याच्या विचारामध्ये इतकी मग्न होते की तुम्ही इथं बसलेले आहात हे ही मला दिसलं नाही, एवढंच काय पण मी तुम्हाला अडखळले हेही माझ्या लक्षात आलं नाही. तुम्हीही नमाज पडताना खरं म्हणजे अशाच अवस्थेत असायला हवं कारण अल्लाह ही जगातील सर्वात मौल्यवान गोष्ट आहे. आणि मग असं असताना तुमचं लक्ष माझ्याकडे

कसं लागलं?''

- बादशहाला त्या गोष्टीची शरम वाटली आणि त्याच्या मित्रांना मागाहून त्या गरीब शेतकऱ्याच्या बायकोची गोष्टी सांगितली, जी ना विद्वान होती, ना मुल्ला होती, तरीही तिने त्याला प्रार्थनेचा खरा अर्थ समजावला होता. प्रार्थना म्हणजे त्या देवाला प्रसन्न करून घेण्यासाठी काही ओळी घोकणं नव्हे, तर संपूर्ण श्रद्धा आणि समर्पणाच्या भावाने त्या देवाशी एकरूप होणे होय.

४८

# जे काय करीत आहात त्यावर लक्ष केंद्रित करा



दोन मैत्रिणी एका महामार्गावर गाडी चालवत होत्या. म्हणजे त्यापैकी एक गाडी चालवत होती, आणि दुसरी तिच्या शेजारी बसून अखंड गप्पा मारत होती. ती बडबड करीत होती, काही विनोद करीत होती आणि काही प्रश्नही विचारत होती. जी मैत्रिण कार चालवत होती ती तिच्या कुठल्याही प्रश्नाचं उत्तर देत नव्हती, तर शांतपणे गाडी चालवत होती. ती बडबड करणारी मैत्रिण तिला बोलतं करण्याचा प्रयत्न करीत होती, पण ती शांतच होती. सरतेशेवटी, तिने विचारलं, ''संपूर्ण प्रवासभर तू अगदीच शांत होतीस. तुझ्या मनामध्ये नक्कीच काहीतरी महत्त्वाचं असं चालू होतं. काय होतं ते सांगू शकशील?''

## ■ प्रश्न :

- कार चालवणाऱ्या मैत्रिणीचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ती म्हणाली, ''होय, तुझं आणि माझं आयुष्य.''
- ही कथा एकाग्रतेची गरज स्पष्ट करते. आपण एखाद्या गोष्टीकडे अगदी अखंडपणे लक्ष पुरवायला पाहिजे, विशेषत: ती माणसं ज्यांचं काम जीवनाशी निगडीत आहे. कधी कधी लोकं गाडी चालवताना हसतात, गप्पा मारतात आणि विनोद करतात. ही बाब अनेकांचे जीव घेऊ शकते, म्हणजे गाडी असणाऱ्यांचे आणि बाहेर रस्त्यावर चालणाऱ्याचेही. लक्ष एकाग्र असेल तर बुद्धीमत्ता जास्त तीव्र होते. माणसाच्या बुद्धीमत्तेची शक्ती ही त्याच्या एकाग्रतेबरोबरच असते. जे काय करीत असाल त्यावर लक्ष केंद्रित करा. वाहावत जाणाऱ्या बुद्धीमत्तेचा काहीही उपयोग नाही आणि एकाग्र मनाला काहीही साध्य करणे कठीण नाही.

४९

# प्रामाणिकपणा ही सर्वोत्तम नैतिकता आहे



न्यू यॉर्कमधली सेंट्रल नॅशनल बँक ऑफ यॉर्कर ही तिच्या तत्पर सेवेसाठी आणि चांगल्या दूरदृष्टीच्या योजनांसाठी प्रसिद्ध होती. तिच्याकडे अनेक ग्राहक होते आणि बँक ग्राहकांशी विश्वासाने आणि प्रामाणिकपणाने व्यवहार करीत असे. बँकेला हे सिद्ध करायचे होते की सर्वसामान्य जनतेवरही त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल विश्वास ठेवू शकतो. हे सिद्ध करण्यासाठी बँकेने एक मोठं भांडं भरून चिल्लर लोकांसाठी भरून ठेवली. ती यासाठी की कुणीही येऊन त्यातील हवी तेवढी चिल्लर तेवढ्याच किंमतीच्या नोटा ठेवून घेऊन जावी. त्यावर कुणीही लक्ष ठेवायला नव्हतं आणि हे सारं लोकांच्या प्रामाणिकपणावरच अवलंबून होतं. या प्रयोगाचा पहिला दिवस संपला तेव्हा बँकेच्या असं लक्षात आलं की....

■ **प्रश्न :**

- पहिला दिवस संपला तेव्हा बँकेच्या काय लक्षात आलं?
- या कथेचे तात्पर्य काय?

■ **उत्तरे :**

- बँकेला अंगदी एका पेनीपर्यंतचा हिशेब बरोबर लागला.
- तसं पाहायला गेलं तर बहुसंख्य लोकं अतिशय प्रामाणिक आणि विश्वासार्ह असेच असतात. काही थोडे लोकंच अप्रामाणिकतेकडे वळलेले दिसतात आणि गुन्हे करतात. अविश्वास दाखवण्यापेक्षा विश्वास दाखवणे केव्हाही चांगलं!

८०

# हृदयाची श्रीमंती दाखवा



रब्बी शेमेल्क हा अतिशय दयाळू होता, तो जातपात न पाहता, पंथ-संप्रदायाचा विचार न करता आणि कोणाचा काय धंदा आहे याचा विचार न करता सर्वांना मदत करायचा. एके दिवशी, तो त्याच्या बागेमध्ये बसलेला असताना एक भिकारी त्याच्या दाराशी आला. त्याने त्याच्या बायकोच्या कपाटाच्या कप्प्यात शोधाशोध केली, त्यातून एक कानात घालण्याचं आभूषण काढलं आणि ते त्याला देऊन टाकलं. जेव्हा बायको परत आली आणि तिला दिसलं की आपल्या कपाटातल्या खणामध्ये आपलं सोन्याचं कानात घालण्याचं आभूषण नाहीये, तेव्हा तिने आरडाओरडा केला आणि रडू लागली. हे आपल्या नवऱ्याने केलं हे तिच्या लक्षात येताच तिने त्याला पन्नास दिनारांच्या बदल्यात ते परत आणायला सांगितलं.

त्या गरम वातावरणामध्ये रब्बी धावतच गेला आणि त्या भिकाऱ्याला शोधून काढलं.

## ■ प्रश्न :

- रब्बीने त्या भिकाऱ्याला काय सांगितलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- रब्बी त्या भिकाऱ्याला म्हणाला, ''हे बघ, त्या कानात घालण्याच्या आभूषणाची किंमत पन्नास दिनार आहे, हे आताच मला कळलं. तुला दुसरं कोणी त्यापेक्षा कमी पैसे देऊन फसवेल, हे लक्षात ठेव.''
- रब्बीसारख्या प्रामाणिक आणि दिलदार हृदयाच्या लोकांविषयी जग आभारीच आहे.

५१

# खरी प्रार्थना म्हणजे काय?



एक विद्वान गृहस्थ आपल्या शिष्यांना नियमित व्याख्याने देत असे. तो खूप शिकलेला होता आणि नेहमीच चांगल्या आणि सकारात्मक गोष्टींची चर्चा तो त्यांच्यासोबत करीत असे. एके दिवशी, तो आपल्या तारुण्यातील रोज प्रार्थना करण्याच्या सवयीविषयी त्यांना सांगत होता, ''मी तेव्हा फार क्रांतिकारी विचारांचा होतो आणि माझ्या साऱ्या प्रार्थना या देवाला हे सारं जग बदलण्याविषयीच असायच्या. मी जेव्हा मध्यम वयामध्ये आलो, तेव्हा माझ्या प्रार्थना या माझं कुटुंब आणि माझे मित्र यांच्यामध्ये काही परिवर्तन होऊ दे म्हणून असायच्या. पण, आता मी वयस्कर झालोय, माझी एक वेगळीच प्रार्थना असते.''

## ■ प्रश्न :

- जेव्हा हा विद्वान माणूस वयस्कर झाला त्याच्या प्रार्थना कशाविषयी होत्या?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- जेव्हा हा माणूस वयस्कर झाला तेव्हा त्याची प्रार्थना त्याच्या स्वत:मध्ये काही परिवर्तन व्हावं, म्हणून देवाची कृपादृष्टी व्हावी अशी होती.
- सगळं जग बदलण्याची अपेक्षा करणंच चुकीचं आहे. प्रार्थना ही स्वत:मध्ये परिवर्तन घडवून आणण्यासाठी केलेली स्वयंसूचना असते, इतरांसाठी नाही. ती आपण स्त्रवत असलेली एक फार मोठी ऊर्जा असते. ॲलेक्स कॅरेल म्हणतो त्याप्रमाणे, ''शरीरातील ग्रंथींचा स्त्राव स्त्रवल्यानंतर जो एक परिणाम माणसाच्या शरीरावर दिसून येतो, तसाच परिणाम प्रार्थनेमुळेही दिसून येतो. प्रफुल्लित राहणाऱ्या चित्तवृत्ती, कुशाग्र बुद्धीमत्ता, नैतिक क्षमता आणि मानवी नात्यांमधली वास्तविकता समजून घेण्याची क्षमता यावर आपण प्रार्थनेचे फल मोजू शकतो. खरी प्रार्थना हा जगण्याचा खरा मार्ग आहे. प्रार्थनेचा मार्ग हाच जगण्याचा खरा मार्ग आहे.''

## ५२

# ताणतणाव कमी करा



जगातल्या मोठ्या आर्थिक व्यवहार बघणाऱ्या एका कंपनीचा व्यवस्थापकीय संचालक न्यूयॉर्कमधल्या त्याच्या कार्यालयामध्ये एका ग्राहकासोबत काही बोलत बसला होता. अचानक, त्याची सचिव अतिशय गडबडलेल्या अवस्थेमध्ये हातामध्ये कागदपत्रांचा एक मोठा गठ्ठा घेऊन आत आली. ती अतिशय उत्तेजित होऊन बोलत होती आणि प्रश्न किती भयानक आहे हे आपल्या साहेबांच्या मनावर ठसवण्याचा ती जोरदार प्रयत्न करीत होती. ''श्रीमती जॉन'', व्यवस्थापकीय संचालक म्हणाले, ''तो नियम क्रमांक तीन पुन्हा एकवार वाचा.''

सचिव असलेल्या त्या स्त्रीला कुणी हलवून जागं केल्याप्रमाणे झालं. तिथून बाहेर जाताना ती त्या कागदाच्या गठ्ठ्याकडे पाहून हसू लागली. अतिशय उत्सुकता ताणली जाऊन त्या ग्राहकाने तीन क्रमांकाच्या नियमाबद्दल विचारलं.

### ■ प्रश्न :

- तीन क्रमांकाचा नियम काय होता?
- एक आणि दोन क्रमांकाचा नियम काय होता?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- तीन क्रमांकाचा नियम हा कुठलीही गोष्ट कुणी एकाने अशी गंभीरपणाने न घेण्याविषयी होता.
- तिथं एक आणि दोन क्रमांकाचे नियम नव्हतेच, फक्त तीन क्रमांकाचा होता.
- कुठलीही गोष्ट अशी गंभीरपणे घ्यायची नसते हेच ही गोष्ट ठासवून सांगते. जेव्हा अशा गोष्टी गंभीरपणे घेतल्या जातात, लोकांच्या मनावरचा ताणतणाव वाढतो. जेव्हा एखाद्या माणसावर ताणतणाव येतो, तेव्हा त्याची कार्यक्षमता अत्यंत कमी होते. कुणालाही आपली कार्यक्षमता वाढवायची असल्यास त्याने ताणतणावमुक्त असणे गरजेचे असते.

५३

# लोकांवर विश्वास ठेवा, तेही विश्वासार्हच असतील



एक मुलगा त्याच्या चोरी करण्याच्या सवयीमुळे शाळेमध्ये फार कुप्रसिद्ध होता. त्याच्याशी जरा बोलून त्याला सुधारावं असं त्याच्या शिक्षिकेला वाटत असे. पण तो काही सहजासहजी बदलत नव्हता. त्या शिक्षिकेचा तसा शिक्षेवरही फारसा विश्वास नव्हता, पण परिस्थिती फार बिघडण्यापूर्वी काही तरी करणे अत्यंत गरजेचे आहे, हे तिला चांगले कळत होते.

एके दिवशी तिने त्याला बोलावून घेतले, त्याला काही पैसे दिले आणि वर्गासाठी काही खरेदी करून आणायला सांगितले. तो मुलगा जेव्हा त्या वस्तू आणि उरलेले पैसे घेऊन परत आला तेव्हा त्या शिक्षिकेने न मोजता ते पैसे ठेवून दिले. तिने वर्गात त्या मुलाचा प्रामाणिकपणा आणि त्याची विश्वासार्हता यांची स्तुती केली. ते ऐकून त्याला धक्काच बसला, कारण तिने जे पैसे त्याला दिले होते, त्यातलेच काही पैसे त्याने चोरलेही होते. ही चूक जेव्हा त्याच्या लक्षात आली, तेव्हा त्याने पुन्हा कधीही पैसे न चोरण्याचा निश्चय करून टाकला.

## ■ प्रश्न :

या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

त्या शिक्षिकेने त्या विद्यार्थ्याला हे दाखवून दिले की मी खरेच तुझ्यावर विश्वास ठेवत आहे आणि या घटनेमुळे त्याचे एका नव्या व्यक्तीमध्ये रुपांतरण झाले. विश्वास हा परिवर्तनशील व्यक्तीमध्ये काही चमत्कार घडवून आणू शकतो.

## ५४

# ज्ञानी माणूस कोण?

खेडेगावातील एक मुलगी अविवाहित असतानाच माता बनली. खेडेगावातील लोकांना ते ऐकून धक्काच बसला, त्यांनी तिला चांगलं झोडपून काढलं आणि त्या जन्माला आलेल्या बाळाचा बाप कोण हे विचारलं. त्यानंतर आश्चर्याची बाब अशी की तिने गावाच्या सीमेवर राहणाऱ्या एका झेन साधूचे नाव घेतले. गावकरी त्याच्या मठाकडे गेले, त्यांनी त्याचं ध्यान चालू असताना त्याला शिव्या देत उठवलं आणि दांभिक म्हणून त्याची संभावना केली.

''तू आमच्या गावातल्या एका मुलीसोबत पापाचरण केलं आहेस. आता तू आई आणि ते बाळ या दोघांचाही सांभाळ केला पाहिजेस.''

तो झेन साधू एवढंच म्हणाला, ''ठिक, असं आहे का?''

त्याने त्या बाळाला आपल्या हातात घेतले आणि त्याच्याकडे अतिशय प्रेमाने पाहिले. पण त्याच्या नावाला जो कलंक लागायचा तो लागलाच. एकेक करता त्याचे सारे शिष्य त्याला सोडून गेले. हे सारे जवळपास वर्षभर चालू होते, शेवटी त्या मुलीला ते काही पाहवले गेले नाही.

ती गावात गेली आणि आपण हे सारं काही खोटं सांगितलं होतं, असं गावकऱ्यांना सांगून टाकलं. त्या बाळाचा बाप हा तो झेन साधू नसून तिच्या घराजवळच राहणारा दुसरा कुणी होता, हे सांगून टाकलं. सारे गावकरी पुन्हा त्या झेन साधूकडे गेले आणि त्याला सारं काही सांगितलं. तो फक्त एवढंच म्हणाला...

### ■ प्रश्न :

- त्या झेन गुरुची प्रतिक्रिया काय होती?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- सगळं ऐकून घेतल्यावर तो साधू म्हणाला, ''ठिक, असं आहे का?''
- जेव्हा त्याच्यावर आरोप ठेवण्यात आले होते, तेव्हा त्याचं उत्तर एवढंच होतं की 'ठिक, असं आहे का?' जी व्यक्ती स्तुती आणि निंदा दोन्हीलाही सारख्याच भावनेने बघते, तीच व्यक्ती खऱ्या अर्थाने ज्ञानी असते. अर्थात् त्यासाठी अत्यंत मानसिक क्षमता हवी असते, अशी उच्च मानसिक स्थिती प्राप्त करण्यासाठी सर्वसाधारण माणूस प्रयत्न करीतच असतो.

५५

# कठीण परिश्रम करून मोठे हेतू साध्य करा



लॉर्ड लुईस माउंटबॅटन, जे भारताचे शेवटचे व्हाईसरॉय होते, हे कठीण प्रश्नावर अगदी बुद्धीमत्तेने आणि पूर्ण क्षमतेने तोडगा काढण्याच्या बाबतीत अगदी जगभर प्रसिद्ध होते. एकदा, ते पत्रकार परिषदेमध्ये पत्रकारांच्या प्रश्नांना उत्तर देत असताना एका पत्रकाराने त्यांची स्तुती केली आणि त्यांना त्यांच्या साऱ्या यशाचं रहस्य विचारलं. लॉर्ड माउंटबॅटन यांनी असं उत्तर दिलं की तिथं उपस्थित असणाऱ्या प्रत्येकाने त्यांना उभं राहून मानवंदना दिली.

## ■ प्रश्न :

- त्यांचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- लॉर्ड माउंटबॅटन म्हणाले, ''सत्य हे आहे की मी एक सर्वसाधारण माणूस आहे, आणि जर मला काही यश मिळालं असं वाटत असेलच तर ते फक्त कठीण परिश्रम आणि प्रामाणिकपणा यामुळे मिळालं आहे.''
- यश हे कठीण परिश्रम आणि कामात झोकून देऊन मिळू शकते. जर तुम्ही तुमच्या उद्दिष्टांकडे वाटचाल सुरुच ठेवली तर प्राप्त करता येणार नाही, असे तुमच्यासाठी काहीही नसते. कठीण परिश्रम हे यशाच्या माळेमधील धाग्यासारखे असते.

५६

# याकडे दुर्लक्ष करू नका



दुर्दैवी घटना या नेहमीच आपल्या हृदयावर आठवणीच व्रण सोडून जातात, पण त्या आपल्याला नेहमीच काही तरी शिकवून जातात. १९१४ मध्ये एडिसनच्या कारखान्यांना आग लागून सारं काही भस्मसात झालं, त्यामुळे सारी उपकरणं विनाश पावून जवळपास दोन मिलियन डॉलर्सचं नुकसान झालं. जेव्हा हे कारखाने आगीमध्ये जळत होते, एडिसनचा मुलगा आपल्या वयस्कर वडिलांची असहायता पाहात होता. एडिसनने मुलाकडे पाहिलं आणि म्हणाले, ''तुझी आई कुठे आहे? जा, हे दृश्य पाहण्यासाठी तिला बोलावून आण. तिच्या पूर्ण आयुष्यात पुन्हा तिला असे दृश्य पुन्हा कधीही बघायला मिळणार नाही.'' त्यांची बायको आली आणि तिने हे भयंकर दृश्य पाहिलं. दुसऱ्या या दिवशी सकाळी दोघेजण फिरायला गेले. तेव्हा त्या कारखान्याच्या उरलेल्या अवशेषाकडे बघत ६७ वर्षांच्या एडिसनने त्याच्या बायकोला काही तरी म्हटले, तेव्हा तिच्या चेहऱ्यावर पुन्हा हास्य पसरले आणि पांढऱ्या पडलेल्या चेहऱ्यावर पुन्हा चैतन्य आलं.

## ■ प्रश्न :

- एडिसन आपल्या बायकोला काय म्हणाला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- एडिसन म्हणला, ''प्रत्येक विनाशाला एक मूल्य असते. आपल्या साऱ्या चुका जळून गेल्या आहेत. आता पुनः नव्याने सुरुवात करता येईल, परमेश्वरा तुझे आभार रे बाबा''
- या कथेमधून जे काय आपल्याला शिकायला मिळाले त्याकडे कधीही दुर्लक्ष करु नका. पराभवाकडे असं सकारात्मक दृष्टीच्या प्रकाशकिरणांच्या साहायाने बघणे हीच यश मिळवण्याची गुरुकिल्ली असते. विश्वातल्या वैज्ञानिक संशोधनामध्ये एडिसनचं नाव नक्कीच सुवर्णाक्षरांनी कायमच लिहिलं जाईल.

८७

# कथांची क्षमता आणि बोधकथा



एका गुरुंनी आपली व्याख्याने बोधकथा आणि कथा यांच्या स्वरुपातून मांडली आणि त्यांच्या शिष्यांना ते खूप आवडलं. ते अतिशय एकाग्रतेने आणि आनंदाने त्यांचं या तंत्राने बोलणं ऐकत असत. पण, बऱ्याचदा असंही होत असे की काही तरी गहन असं ऐकावं म्हणून बसलेल्या शिष्यांना त्यामुळे निराश ही वाटत असे. या साऱ्या तक्रारी ऐकून ते गुरु आपल्या विचारांवर ठाम राहिले आणि त्यांनी त्या आक्षेपांना एकच उत्तर दिलं.

## ■ प्रश्न :

- गुरुंचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- गुरु म्हणाले, ''माझ्या शिष्यांनो, तुम्ही एक गोष्ट समजून घ्या, माणूस आणि सत्य यांच्यातील सूक्ष्म अंतरामध्ये एक कथा असते.''
- कथा एखाद्या आलेखाप्रमाणे सुस्पष्टपणे सत्य व्यक्त करीत असते. आपण कथांची सांगड नेहमीच लहान मुलांसोबत घालत असलो तरीही एक खोलवर दडलेलं सत्य व्यक्त करण्याचं सामर्थ्य त्यात असतं, याकडे दुर्लक्ष करुन चालणार नाही.

५८

# मोबदला मिळतो, त्यापेक्षा जरा जास्त काही करा



एका कंपनीच्या व्यवस्थापकीय संचालकांकडे एक सचिव होती, जी काही दिवसांपासून त्यांच्याकडे काम करीत होती. एके दिवशी, त्यांनी तिने केलेल्या कठीण परिश्रमासाठी तिला बढती देण्याचे ठरवले. या आनंददायक बातमीने तिला जरा आश्चर्यचकीत करण्यासाठी त्यांनी आपला निर्णय एका कागदावर खरडला, तिच्या कक्षामध्ये गेले आणि ते टाईप करायला सांगितलं. तिने फक्त त्याकडे एकदा पाहिलं आणि आपलं काम करीत राहिली, तो कागद तसाच पडू दिला. आपल्या साहेबांनी एक चिठ्ठी आपल्याकडे दिली आहे, तर त्याच्याकडे पाहण्याचं कष्टही तिने घेतलं नाही.

## ■ प्रश्न :

- तिच्या साहेबांची प्रतिक्रिया काय होती?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- त्या साहेबांनी आपल्या सचिवाला बढती देण्याचा निर्णय लगेच रद्द केला. कुठल्याही कर्मचाऱ्याला बढती ही त्याला कामासाठी प्रोत्साहित करण्यासाठी मिळत असते आणि त्यामुळे उत्पादकता म्हणजे कार्यक्षमताही वाढते. तथापि, एखाद्या चांगल्या निर्णयाबद्दल आदर न दाखविल्याने चांगला निर्णय घेणाऱ्याला परावृत्त करु शकते. केवळ साहेबांकडे दुर्लक्ष केल्यामुळे त्या सचिवाची बढतीची संधी हुकली.
- कोणत्याही मालकाला आपण ज्यासाठी कर्मचारी ठेवला आहे त्यापेक्षा त्याने थोडं जास्त काम मनापासून केलेलं आवडतं. खरं समर्पण आणि कामात झोकून देण्याची वृत्ती पुढे बरेच काही मिळवून देते.

५९

# जे स्वत:ला मदत करतात, त्यांनाच देव मदत करतो



एका गरीब स्त्रीला तिच्या नवऱ्याने सोडून दिलं. हे ऐकून तिची शेजारीण तिचे अश्रू पुसायला आणि तिला समजवायला तिच्या घरी आली. पण तिच्यासाठी आश्चर्याची बाब म्हणजे नवऱ्याने टाकल्याने ती काही भ्रमिष्ट झालेली किंवा असहाय वगैरे काहीही नव्हती, तर छानपैकी आनंदी, उत्साही आणि आत्मविश्वासपूर्ण स्त्री वाटत होती. ''तुझ्यावर तर काहीही परिणाम झालेला दिसत नाहीये आणि तू आनंदी दिसतेस. तुला तुझ्या भविष्याची काळजी नाही का? तू स्वत:ला कसा काय आधार देऊ शकशील? आधाराचं तुझ्या दृष्टिकोनातून काय मूल्य आहे?'' त्या स्त्रीने जे उत्तर दिलं, ते उत्तम आणि काही तरी शिकवणारं होतं.

## ■ प्रश्न :

- त्या नवऱ्याने टाकून दिलेल्या स्त्रीचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- त्या स्त्रीने उत्तर दिलं, ''माझ्या आयुष्यामध्ये तीन महत्त्वाचे आधार आहेत, माझे हात, माझं चांगलं आरोग्य आणि परमेश्वर. इतर कुठल्या गोष्टीची मला गरज वाटत नाही.
- या कथेवरून मला कवितेच्या काही ओळी आठवतात

''नका विसंबू दुसऱ्यावर,

विश्वास ठेवा स्वत:वर, विश्वास

ठेवा कष्टावर, इतरांच्या

मर्जीने जगणे, म्हणजे

केवळ दु:ख भोगणे, जो

स्वावलंबी झाला, तोच

खरा सुखी झाला''

६०

# क्षमा करायला शिका



एकदा एका शाळकरी मुलाला त्याने एक गंभीर चूक केली म्हणून शाळेच्या प्राचार्यांकडे पाठवण्यात आले. काय झालं ते ऐकल्यानंतर प्राचार्यांनी एक कोरी वही घेतली, आणि त्यावर त्या मुलाचं नाव लिहिलं, मग त्यावर काय तक्रार होती ते लिहिता लिहिता प्राचार्य म्हणाले की...

## ■ प्रश्न :

- प्राचार्य काय म्हणाले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- प्राचार्यांनी त्या वहीत एक नोंद केली आणि त्या मुलाला म्हणाले, ''मी हे सारं शिसपेन्सिलीने लिहित आहे आणि तुझा गुन्हा गंभर आहे, असं मी आता तरी समजत नाही. अर्थात्, जर या वर्षभरामध्ये तुला दुसऱ्यांदा माझ्याकडे पाठवलं गेलं नाही तर मी जे काय लिहिलं आहे ते खोडून टाकील आणि त्याबद्दल कुणालाच काहीही कळणार नाही.''
- दया हा सद्गुण प्रत्येक व्यक्तीने आपल्या मनात ठसवावा असा आहे.

६१

# आहे त्यात समाधानी राहा



एकदा एकाने आपल्या रिकाम्या जमिनीवर एक पाटी लावली. ''जो आयुष्यात समाधानी आहे, त्याच्यासाठी ही जमीन ठेवण्यात आलेली आहे.''

जवळच राहणारा एक श्रीमंत शेतकरी तिथून जाताना थांबला आणि ती पाटी वाचून विचार करु लागला, ''आता माझा मित्रच जर जमीन अशी देण्याची इच्छा करीत असेल तर कुणी तिथं जाण्यापूर्वी मीच जाऊन का मागू नये? मी श्रीमंत आहे. मला सारं काही मिळालं आहे. मला अजून गरजही भासेल, त्यामुळे मी एकटाच याला लायक आहे.'' तो त्याच्याकडे गेला आणि कशासाठी आला हे त्याला सांगितलं.

''तू आयुष्यात समाधानी आहेस का?'' त्याने विचारलं.

''नक्कीच! माझ्याजवळ मला हवं ते सारं काही आहे.''

तेव्हा तो त्याच्या विनंतीला उत्तर देताना म्हणाला...

## ■ प्रश्न :

- त्याची प्रतिक्रिया काय होती?
- या कथेचे तात्पर्य काय होती?

## ■ उत्तरे :

- ''मित्रा'' तो म्हणाला, ''जर तू आयुष्यामध्ये एवढा समाधानी आहेस तर मग तुला ही जमीन कशाला हवी आहे?''
- जर इतर लोकं पैशासाठी धडपडत असतील तर ज्यांच्याजवळ आहे त्यांनी, आहे त्यामध्ये समाधान मानायला काय हरकत आहे? थोड्याशा गोष्टींनीही समाधानी होणं म्हणजे राजा होण्यासारखं आहे.

६२

# प्रत्येकाच्या वेगळेपणाचा स्वीकार करा



लंडनमधल्या कॅथेड्रलजवळून दोन माणसं चालत जात होती. त्यावेळी कॅथेड्रलमध्ये संगीत वाजत होते. त्यातला एकजण म्हणाला, ''संगीत ऐक, किती छान आहे.'' तेव्हा दुसरा म्हणाला.

## ■ प्रश्न :

- दुसरा काय म्हणाला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- दुसरा माणूस म्हणला, ''कशाचं संगीत? मला कुठलंही संगीत ऐकू येत नाही. कॅथेड्रलमधून सगळा गोंधळ ऐकू येतोय नुसता. सगळं संगीत त्यामध्ये दबलंय.''
- म्हणतात ना, एकासाठी अन्न तर दुसऱ्यासाठी तेच विष असतं. लोकांना वेगवेगळ्या गोष्टी आवडतात, त्यांच्या आवडीनिवडीही वेगवेगळ्या असतात. जगातल्या प्रत्येक व्यक्तीला निवड करण्याची आणि हवं ते पसंत करण्याची संधी आणि हक्क आहे.

## ६३

# अंदाज काही उपयोगाचा नाही



एका पाद्र्याला लहान मुलं आणि कुत्रे यांचं खूपच वेड होतं. तो आजुबाजूच्या कुत्र्यांना रोजच काही ना काही खाऊ घालत असे. लहान मुलांमध्ये जरा जास्तच प्रसिद्ध असल्यामुळे तोही कायमच त्यांच्यामध्ये मिसळायचा. त्याचा त्या दिवशी वाढदिवस होता आणि त्यामुळे सारी मुलं त्याच्या वाढदिवसासाठी भेटकार्डे आणि काही ना काही भेटी घेऊन आले होते. मग फादरनी छोट्या मेरीच्या हातून ते बांधलेलं पुडकं घेतलं आणि म्हणाले, ''अहा, तू माझ्यासाठी पुस्तक आणलंय तर...!'' (मेरीच्या वडिलांचं गावत पुस्तकाच दुकान होतं.)

''होय, पण तुम्हाला कसं काय कळलं?''

''फादरला हे कळत असतं'', फादर अभिमानाने म्हणाले.

''आणि तू... टॉमी तू माझ्यासाठी स्वेटर आणलंस...'' टॉमीने आपल्यासमोर धरलेलं पुडकं हातात घेत फादर म्हणाले. (टॉमीच्या वडिलांचं लोकरीच्या वस्तू विकण्याचं दुकानच होतं.)

''बरोबर आहे फादर. पण तुम्हाला कसं काय कळलं?''

''फादरला हे बरोबर कळतंच'', फादरनी पुन्हा तसंच उत्तर दिलं.

आणि मग, हे असं बॉबीने आणलेल्या पुडक्यापर्यंत चालू राहिलं. त्याचं पुडकं किंचित ओलं दिसत होतं. (बॉबीचे वडील दारु आणि वाईन विकायचे)

मग फादर सहज म्हणाले, ''हं, तर तू माझ्यासाठी थोडीशी वाईन किवां दारु आणलीस आणि त्यातली थोडी हिंदकाळलीस, हो ना?''

''चूक, फादर!''

तोपर्यंत फादरची बोटं त्यामुळे भिजली होती आणि त्यांनी एक बोट तसंच तोंडात घालून चव घेतली, पण त्यांना नेमकं काय हे ओळखता आलं नाही.

**■ प्रश्न :**

- बॉबीची भेटवस्तू काय होती?

- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- बॉबीने एक छोटं कुत्र्याचं पिल्लू पुडक्यात बांधून भेट देण्यासाठी आणलं होतं.
- आपण सर्वज्ञानी आहोत असा गमतीमध्येही आव आणू नये.

## ६४

# धन हीच शक्ती



एका माणसाने पैश्यांच्या प्रभावाविषयी आपल्या मित्राशी शर्यत लावली. पैसा सर्व काही विकत घेऊ शकतो, असं तो म्हणाला. ते सिद्ध करण्यासाठी तो गावातल्या मोठ्या चर्चमध्ये पाद्र्याकडे गेला आणि म्हणाला, ''फादर, माझा कुत्रा कालच मेला, मला त्याच्या स्मरणार्थ इथं सामुहिक प्रार्थना आयोजित करण्याची इच्छा आहे.''

या पाद्रयाने अर्थातच त्याची विनंती अमान्य केली. ''इथं प्राण्यांसाठी अशा सामुहिक प्रार्थना आयोजित केल्या जात नाहीत. तुम्ही पायंडा मोडून नवीन काही तरी करु पाहात आहात. लोकं असे जमून तुमच्या कुत्र्यासाठी प्रार्थनेत सहभागी होणं फार कठीण आहे.''

त्या माणसाने आशा सोडली नाही, आणि आग्रह धरला. काही क्षणांनी त्याच्या त्या मित्राला आश्चर्य बसला कारण फादरनी सहमती दर्शवली आणि मित्राने शर्यत जिंकली.

### ■ प्रश्न :

- त्या माणसाने फादरला काय सांगितलं असेल असं तुम्हाला वाटतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- तो माणूस फादरला म्हणाला, ''माझं कुत्र्यावर फारच प्रेम होतं आणि मला त्याच्यासाठी एक चांगला निरोप समारंभ आयोजित करायचा आहे. अशा प्रसंगी काय नियमाप्रमाणे द्यायचे असेल ते असो, पण मी मात्र त्यासाठी पाच लाख डॉलर्स खर्च करण्याचं ठरवलं आहे, तुमचं काय म्हणणं आहे?''
- पैशाचा प्रभाव हा संतांवरही होतोच. एक निष्कर्ष असा आहे की प्रत्येकाला जास्तीत जास्त पैसा मिळवावा असे वाटतेच. त्यामुळे जे हवे ते विकत घेता येते.

६५

# सभ्य बना - तुम्हाला कदाचित चांगली मैत्री मिळेल



एका माणसाने दिवसभरासाठी एक टॅक्सी भाड्याने घेतली, संपूर्ण शहरभर फिरल्यानंतर जेव्हा त्याने पैसे देण्यासाठी पैशाचे पाकिट काढले, तेव्हा त्या टॅक्सी चालकाने पैसे घेण्यास नकार दिला.

## ■ प्रश्न :

- त्या टॅक्सीच्या चालकाने पैसे घेण्यास का नकार दिला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- तो चालक म्हणाला, ''मी जवळपास वीस वर्षांपासून टॅक्सी चालवत आहे. या वीस वर्षांमध्ये तुम्ही असे पहिलेच आहात जे माझ्याशी इतक्या सभ्यपणे आणि नम्रपणे वागला आहात. तुमच्यामध्ये मला माझा मित्र सापडला आहे. ज्याच्याकडून मी पैसे नाही घेणार.''
- जो सभ्यपणा पेरतो त्याला मैत्रीचे फळ मिळतेच. जो दया पेरतो त्याला प्रेम मिळते. ज्याने मित्रांची मैत्री जिंकली त्याने सारं काही मिळवल्याप्रमाणे आहे.

## ६६

# क्षमेच्या सद्गुणाचा विकास करा



एकदा सोळाव्या लुईच्या मुलाला एका शत्रूराष्ट्राने कैद करून घेतले आणि छळछावणीमध्ये पाठवून दिले. फ्रेंच साम्राज्याचा उत्तराधिकारी म्हणून त्याला त्यावेळेसच्या अतिशय कठोर अशा कारागृह अधिक्षकांपैकी एकाकडे कैदी म्हणून पाठवण्यात आले. केवळ राजघराण्यामध्ये जन्म घेतलेला आहे म्हणून त्या लहानशा, असहाय मुलाला मारण्यासाठी हा अधिक्षक टपलेलाच होता. रोजच त्याचा छळ थोडासा वाढे आणि प्रत्येक वेळी, परमेश्वराची प्रार्थना करीत ते मूल तो छळवाद अगदी सहजपणे सहन करीत असे.

एके दिवशी, त्या अधिक्षकाने विचारलं, ''कॅपेटो, व्हेन्डेनॉसनी तुला मोकळं सोडून दिलं तर तू काय करशील? माझ्याशी कसा वागशील? मला फासावर देशील?''

**■ प्रश्न :**

- त्या लहानं मुलाचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय होतं?

**■ उत्तरे :**

- त्या लहानशा मुलाने स्मित केले आणि म्हणाला, ''मी तुम्हाला क्षमा करेन .''
- क्षमा करणे हा फार मोठा सद्गुण समजला पाहिजे. सेंट फ्रांसिसचं एक वचन आहे, ''जर कुणी तिरस्काराने माझा डावा डोळा काढून टाकला, तर मी त्याच्याकडे माझ्या उजव्या डोळ्याने दयेने बघेन. जर त्याने माझा तो ही डोळा काढून टाकला तर माझे हृदय त्याच्यावर प्रेम करण्यासाठी असेलच.''

६७

# वास्तवातील वर्तमानाचा आनंद घ्या



ही कथा एका गाजलेल्या रब्बीची आहे, ज्याचं नाव होतं मोशे. तो त्याच्या हुशारीबद्दल आणि सहृदयतेबद्दल प्रसिद्ध होता. तो अपघातामध्ये वारला, त्यामुळे त्याचे अनेक शिष्य निराश झाले आणि त्यांना धक्का बसला. दुसरा एक रब्बी मेंडेल याने एकदा त्याच्या मठाला भेट दिली आणि सर्व शिष्यांमध्ये आपल्या गेलेल्या रब्बीविषयी काय भावना आणि काय प्रेम होतं, ते जाणून घेतलं. त्याने त्याच्या शिष्यांपैकी एकाला विचारलं, ''तुमचे गुरु कोणत्या गोष्टीला महत्त्व देत होते?''

त्या शिष्याने एका क्षणानंतर प्रतिसाद दिला आणि जे उत्तर दिलं त्यावरुन त्या रब्बीला कळलं की रब्बी मोशे किती मोठे होते.

**■ प्रश्न :**

- त्या शिष्याचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- तो शिष्य म्हणाला, ''रब्बी मोशेंना कोणत्याही क्षणी जे काय करावं लागायचं त्याला ते खूप महत्त्व देत असत.''
- वर्तमानामध्ये जगण्यातच खरं पावित्र्य आहे. वर्तमानातील क्षणाला साक्षी राहणे म्हणजेच साक्षात्कार होय. जो माणूस वर्तमानामध्ये राहतो, तो भूतकाळ विसरतो आणि भविष्याविषयीही उदासिन राहतो, असा माणूस सजग आणि ज्ञानी पुरुष असतो. उद्याच्या कामाची पूर्वतयारी करणे म्हणजे तुमचं काम आजच करणे होय. उद्याच्या जगण्याची पूर्वतयारी करणे म्हणजे आता आणि या क्षणी जगणे होय. तुम्ही उच्च आणि चांगले जगा. भूतकाळाची कवाडे बंद करा, न जन्मलेल्या भविष्यकाळाची काळजी करु नका, पण वास्तवातील वर्तमानाचा आनंद घ्या.

६८

# तुलना करू नका



एका वडाच्या झाडाच्या अगदी टोकावर एक लहानशी सुंदर चिमणी राहात होती. ती तिच्यासोबत चिमण्यांना आकाशामध्ये उंच उंच उडताना पाहायची आणि स्वत:ला ती कमी समजायची. तिला प्रत्येक गोष्टीमध्ये तिरस्काराची भावना निर्माण व्हायची. ''तू मोराला छान रंग दिलेस, तू बुलबुल पक्ष्याला छान आवाज दिलास, पण मी? मला तू काहीही नाही दिलंस. का?''

तेव्हा एकदा देवाने उत्तर दिलं...

## ■ प्रश्न :

- देवाचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- देव म्हणाला, ''तुला फक्त दु:ख भोगण्यासाठी निर्माण केलेले नाहीये आणि आता तूही तिच चूक करीत आहेस, जी माणूस नेहमी करीत असतो. तू स्वत:ची बनण्याचा प्रयत्न कर आणि तू स्वत:च श्रेष्ठ बनतेस की नाही ते बघ. तुझं स्वत:चं वेगळेपण जाणून घे आणि तुला ज्यामध्ये आनंद वाटेल अशा मार्गाने जाण्याचा आनंद तू मिळव.''
- प्रत्येक जण देवाच्या प्रतिमेप्रमाणे बनवलेला आहे. त्याने बनवलेल्या प्रत्येक निर्मितीला वेगळे आणि स्वतंत्र अस्तित्व आहे. वास्तवाकडे आपण नेहमी एका सकारात्मक जीवनऊर्जेच्या स्वरुपात बघायला हवे, एक दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठ किंवा कमी आहे म्हणून बघण्याचा दृष्टीकोन नको. बहुतांशी माणसं ही आपलं आयुष्य इतरांपेक्षा कमी दर्जाचं आहे म्हणून त्याकडे बघतात, त्यामुळे आयुष्यभर अशी माणसं स्वत:च ते आणि आनंद यांच्यामधला अडथळा बनतात.

# ६९

# देण्यातून आनंद मिळवा



विल्यम अ‍ॅलेन व्हाईट, अमेरिकेतल्या इम्पोरियामधील प्रसिद्ध साधूपुरुष याने स्वत:चा जवळपास पन्नास एकरांचा हिरवागार भाग बगीचा तयार करण्यासाठी आपल्या शहराला देऊन टाकला. हे सारं देताना श्री. व्हाईट म्हणाले, ''मी माझ्याकडील ज्या काही मुठभर डॉलर्समधून मोकळा होतोय , त्यातून मिळणारा हा शेवटचा आनंद आहे. मला लोकांना हे सांगायचं आहे की तुम्ही मिळवता त्या प्रत्येक डॉलरमधून तीन वेळा असा आनंद मिळतो. ''

## ■ प्रश्न :

- प्रत्येक डॉलरमधून मिळणारे तीन आनंद कोणते?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- तो म्हणाला, ''ते तीन आनंद... जेव्हा तुम्ही कमावता तेव्हा, दुसऱ्यांदा जेव्हा तुम्हाला ते मिळतं तेव्हा आणि शेवटी तिसऱ्यांदा तुम्ही ते कोणाला देता तेव्हा होतो.''
- मूर्ख माणसं कमावतात आणि साठवून ठेवतात. पैसा कमावणं आणि आपल्या श्रमाच्या फळाचा आनंद घेणं अगदी नैसर्गिक आहे. तथापि, श्रेष्ठ माणसं त्यांनाच म्हटलं जातं जी कमावतात आणि समाज आणि सगळ्या मानवतेसाठी ते खर्च करतात. देण्यामधला आनंद फार मोठा

७०

## देण्याच्या आनंदाचा अनुभव



हेन्री फोर्ड, जो कारचा जनक मानला जातो, तो एकदा डबलीनमध्ये आपली सुट्टी घालवण्यासाठी आला होता. तिथं अनाथालयाचं एक प्रतिनिधीमंडळ त्याला त्या हॉटेलमध्ये भेटण्यासाठी आलं, त्यांच्या अनाथालयासाठी जी नवी इमारत बांधायची होती, त्यासाठी त्यांना मदत हवी होती. या चांगल्या कामासाठी मदत म्हणून श्री. फोर्ड यांनी लगेच दोन हजार पौंडाचा धनादेश फाडला. दुसऱ्या दिवशी वर्तमानपत्रामध्ये बातमी अशी होती की फोर्ड यांनी आयरिश अनाथालयासाठी वीस हजार पौडांचा धनादेश दिला आहे. त्याच सकाळी लगेचच त्या अनाथालयाचे संचालक फोर्ड यांची माफी मागण्यासाठी धावत आले आणि त्या वर्तमानपत्राच्या संपादकाला आपण चुकीची दुरुस्ती करायला सांगू, हे सांगू लागले.

''काही हरकत नाही'', फोर्ड यांनी दुसरा एक अठरा हजार पौंडचा धनादेश लिहिला, ''तुम्हाला हा धनादेश एका अटीवर मिळेल...''

### ■ प्रश्न :

- ती अट कोणती?
- या कथेचे तात्पर्य काय होते?

### ■ उत्तरे :

- फोर्ड म्हणाले, ''जेव्हा तुमची नवी इमारत बांधून होईल, त्याच्या प्रवेशद्वारासमोर असे लिहा. मी अनोळखी होतो आणि तुम्ही मला आत घेतलं.''
- एक मोठा माणूस या प्रत्येक गोष्टीची मजा घेतो. फोर्ड यांनी औदार्यासोबतच विनोदही साधला होता. त्यांनी वाक्य वापरताना 'आत घेतलं' असा शब्द वापरला. या शब्दाचा एक अर्थ आसरा देणं असा तर आहेच आहे, पण त्यासोबतच 'मूर्ख बनवणे, फसवणे' असा ही एक आहे.

## ७१

# तुम्ही तुमच्या मुलाचं शिक्षण केव्हा सुरु करु शकता?



एकदा, एक तरुण माता ॲरिस्टॉटलकडे आली आणि तिने विचारलं, ''मी माझ्या मुलाचं शिक्षण केव्हा सुरु करु शकते?'' ॲरिस्टॉटलने विचारलं, ''तुमचा मुलगा किती वर्षांचा आहे?'' ती म्हणाली की पाच वर्षांचा आहे. त्याचक्षणी ॲरिस्टॉटल ओरडला...

**■ प्रश्न :**

- ॲरिस्टॉटल काय ओरडला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- ॲरिस्टॉटल ओरडला, ''मग पटकन घरी जा. आधीच तुम्हाला पाच वर्षे उशीर झालाय.''
- मुलाचं शिक्षण खरं तर तो जन्मत:च सुरु होतं. मुलांवर लहानपणीच ज्यांचा परिणाम होतो, ते आईवडील असतात, कारण ते त्याला घर नावाच्या शाळेमध्ये मूल्यशिक्षण देतात.

## ७२

# ज्ञानाची किंमत ओळखा



एकदा एका कारखान्यातील एक महत्त्वाचं यंत्र अचानक बंद पडलं. अर्थात त्याचा परिणाम म्हणून कारखान्यातील सगळं काम बंद पडण्याची वेळ आली. कारखान्यातील सगळे मुकादम आणि अभियंते यांनी खूप प्रयत्न केला, पण तो अयशस्वी झाला. शेवटी ते यंत्र पुन्हा व्यवस्थित करण्यासाठी एका तज्ज्ञाला पाचारण करण्यात आलं. त्या यंत्राची सारी बारीकसारीक तपासणी केल्यानंतर त्याने एक हातोडा घेतला आणि त्या यंत्राच्या एका विशिष्ट भागावर मारला. त्याचक्षणी ते यंत्र अगदी पूर्ववत काम करू लागलं.

त्यानंतर त्या तज्ज्ञाने त्या यंत्राच्या दुरुस्तीसाठीचे १०,००० रुपयांचे बिल पाठवले. अर्थातच, त्या तज्ज्ञाला हे विचारण्यात आले की फक्त एक हातोडी घेऊन एक फटका मारण्याचे १०,००० रुपये कशासाठी द्यायचे? मग त्या तज्ज्ञाने ते बिल जरा वेगळे लिहिले आणि वसूलीसाठी पाठवून दिले.

### ■ प्रश्न :

- त्या तज्ज्ञाने त्या बिलामध्ये काय बदल केला होता?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- त्याने बदलून दिलेले बिल असे होते :

| काम | रुपये |
|---|---|
| त्या यंत्राला हातोड्याने फटका मारण्याची फी | ०.००५ |
| फटका मारण्याची जागा शोधण्याची फी | ९,९९५ |
| एकूण | १०,००० |

- ज्ञान हीच शक्ती आहे. प्रचंड कष्ट, बुद्धीमत्ता आणि परिश्रम यांची गरज ज्ञान मिळवण्यासाठी असते. तज्ज्ञाला कुणीही पैसे देतात ते त्यांच्या वेळेचे नाही तर त्यांच्या तज्ज्ञ असण्याचे देत असतात.

## ७३

# तुम्ही मनात जेवढा विचार करता फक्त तेवढेच तुमचे वय असते



थॉमस एडिसन हा अशा काही मोजक्या लोकांपैकी एक होता ज्याचा ठाम विश्वास होता की वय तीच बाब असते ज्याचा विचार तुम्ही तुमच्या मनात करीत असता आणि तुम्ही जेवढा विचार करीत असता, तेवढेच तुमचे वय असते. त्याच्या वयाच्या ऐंशीव्या वाढदिवशी, त्याच्या काही मित्रांनी त्याला सल्ला दिला की त्याने आता थोडी विश्रांती घ्यायला पाहिजे आणि आता स्वत:साठी जरा वेळ द्यायला पाहिजे. ''तुला आता स्वत:साठी कशाचा तरी छंद लावून घेणे योग्य होईल. तू गोल्फ का बरे खेळत नाहीस?'' एडिसन म्हणाला....

**■ प्रश्न :**

- एडिसन आपल्या मित्रांना काय म्हणाला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- एडिसन म्हणाला, ''पण अद्याप माझं तेवढं वय झालेलच नाहीये.''
- अगदी रापलेल्या ऐंशीव्या वर्षीसुद्धा एडिसन स्वत:वर असा विनोद करीत होता की मी चांगला तरुण आहे. तुम्ही या पृथ्वीतलावर किती वर्षे काढली यावर वय अवलंबून नसतेच. या उलट असाही विचार करता येईल की तुम्ही ती वर्षे कशी काढलीत? ज्याच्या मनामध्ये आयुष्यात काही तरी मोठं करण्याचा ज्वलंत आशावाद असतो, अशा माणसाला वयाची मर्यादा काहीही करु शकत नाही.

७४

# व्यवहारचतुर बना



कुठल्याशा दूरदेशाच्या एका पराक्रमी शासकाला कोबीची भाजी खाणे खूपच आवडत असे. त्याला कुठल्याही स्वरुपामध्ये कोबी खाणं आवडत असे म्हणून तो आपल्या स्वयंपाक्याला कायमच कोबी शिजवायला सांगत असे. आपल्या मालकाला खूश करण्यासाठी तो बिचारा स्वयंपाकी रोजच कोबीचे वेगवेगळे पदार्थ बनवण्याचा कसोशीने प्रयत्न करीत असे. एकदा, कोबीचा पदार्थ जरा जास्तच खाल्यामुळे मालकाचं पोट बिघडलं. त्याने ताबडतोब आपलं मत बदललं आणि आता असं सांगू लागला की कोबी ही जगातील सर्वात भयंकर गोष्ट आहे. स्वयंपाकीही त्याच्याशी सहमत झाला आणि कोबी बनवणे त्याने बंद केले. स्वयंपाक्याच्या अशा हो ला हो म्हणण्याच्या वृत्तीचा मालकाला त्रास होऊ लागला आणि आपल्या दोन्हीही मताशी तू का सहमत आहेस, असा प्रश्न त्याने त्याला विचारला. तो स्वयंपाकी म्हणाला...

## ■ प्रश्न :

- त्या स्वयंपाक्याचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- तो स्वयंपाकी म्हणाला, ''मी तुमचा नोकर आहे, मालक, त्या कोबीचा नाही.''
- व्यवहारचातुर्याने माणसाचं हृदय जिंकता येतं.

## ७८

# सरावामुळे प्रावीण्य येते



पॅडेरेव्स्की, जो एक गाजलेला व्हायलिनवादक होता, तो रोज दहा ते बारा तास सराव करायचा, अगदी तो यशाच्या शिखरावर असतानाही करायचा. एकदा एका कार्यक्रमानंतर त्याच्या व्हायोलिनवादनावर अतिशय प्रेम करणाऱ्या एका रसिकाने, ज्याला स्वत:ला व्हायोलिनवादन शिकायचं होतं, त्याने त्यांना प्रश्न विचारला की, या यशाचं रहस्य काय? पॅडेरेव्स्कीने त्याला सांगितलं....

■ **प्रश्न :**

- पॅडेरेव्स्कीने त्याला आपल्या यशाचं रहस्य काय सांगितलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

■ **उत्तरे :**

- तो म्हणाला, ''मी अगदी आत्मविश्वासाने ही बाब सांगू इच्छितो की मी एक दिवस जरी सराव केला नसता, तर आजचं चित्र जरा वेगळं असतं. मी दोन दिवस जरी सराव केला नसता तर माझ्या टिकाकारांनी ते शोधून काढलं असतं आणि मी जर तीन दिवस सरावाकडे दुर्लक्ष केलं असतं, तर साऱ्या जगाला हे कळलं असतं.''
- खरंच यशस्वी होण्यासाठी, तुम्ही तुमची शस्त्रे सतत परजून तयार ठेवायलाच हवी आणि यशाने स्वत:ला आत्मसंतुष्ट होऊ देऊ नका. कारागिराच्या कुठल्याही अवजाराला जास्त दिवस न वापरल्यास गंज लागायला फारसा वेळ लागत नाही आणि रोजच वापरली गेली नाही तर लवकरच निरुपयोगी होतात.

## ७६

# तुम्हीच तुमचा वर्तमान आणि भविष्यही आहात



एक गृहस्थ अगदी ऐषारामात राहात असताना त्याला अचानक नैराश्य आले आणि तो दु:खी झाला. त्यामुळे, जरी तो खूप होतकरु होता तरीही तो आपल्या कामाकडे आणि आपल्या उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी व्यवस्थित लक्ष देऊ शकेनासा झाला. पण त्याने त्याच्या उद्दिष्टांचा पाठलाग करणे सुरुच ठेवले, पण त्यामुळे त्याचा वर्तमानाशी संबंध तुटल्यासारखा झाला. अर्थातच, त्याचा परिणाम त्याच्या कामावर झालाच. त्याचा परिणाम म्हणून तो पुन्हा दु:खी झाला. त्याने पुन्हा अंतर्मुख होऊन चांगल्या प्रकारे कारण जाणण्याचा प्रयत्न केला, पण त्याच्या या अवस्थेचं नेमकं कारण काय आहे, हे काही त्याला सांगता येईना.

सरतेशेवटी, तो एका ज्ञानी पुरुषाकडे गेला आणि त्याला नेमकं काय होतंय, हे सांगितलं. त्याचं सारं ऐकून घेतल्यानंतर तो साधुपुरुष म्हणाला...

### ■ प्रश्न :

- तो साधुपुरुष काय म्हणाला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- तो साधू म्हणाला, ''भल्या माणसा, तुझ्या मनाची अवस्था अशी दु:खी होण्याचं कारण इतर काही नाही, तू स्वत:च आहे. तू स्वत:चं उद्दिष्ट तुझ्या डोळ्यासमोर स्वच्छ दिसत असताना मृगजळाच्या मागे धावत आहेस. कृपा करुन ही बाब लक्षात घे की जर तुझी दृष्टी फार दूरवरच बघण्यासाठी स्थिर असेल तर तू नक्कीच तुझ्या पायाखालची पायरी चुकणार आहेस.''
- जर आपण भविष्यातील उद्दिष्ट्ये प्राप्त करु शकलो तरच आपण आनंदी होणार आहोत, असा गैरसमज करुन बहुतेक लोकं स्वत:लाच फसवत असतात. पण बहुतेकांच्या हे लक्षात येत नाही की आपल्याला वर्तमान आणि भविष्य यांच्याकडे सारखंच लक्ष द्यावं लागतं. पुढे कुठेतरी इप्सित जागी आपल्याला तिथं आनंद मिळणार आहे म्हणून आपण त्याकडे बघू शकत नाही. खरा आनंद हा उद्दिष्ट्ये प्राप्तीच्या मार्गावरच असतो, तेही प्रवासामध्ये आणि शेवटासतर निश्चितच नाही.

७७

# कठीण परिस्थितीमध्ये प्रेरणादायक



जेव्हा मंदी अगदी शिगेला पोहचली होती, कारखान्यांची परिस्थिती पार अधोगतीला आली होती. स्थिती अगदी खराब झाली होती. तेव्हा कारखान्याच्या अध्यक्षांनी आपल्या साऱ्या कर्मचाऱ्यांसाठी एक महत्त्वाची उद्धोषणा केली.

## ■ प्रश्न :

- ती उद्धोषणा काय होती?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ती उद्धोषणा अशी होती :

  सर्व कर्मचाऱ्यांना असे सुचित करण्यात येत की, वाढत्या स्पर्धेमुळे आणि याच व्यवसायामध्ये टिकून राहण्याच्या इच्छेमुळे एक नवी योजना सर्वांसमोर ठेवणे आम्हाला गरजेचे वाटते आहे. आम्ही तुम्हाला, म्हणजेच आमच्या या संघटनेमधील सन्माननीय कर्मचाऱ्यांना, हे विचारत आहोत की, काही वेळेस म्हणजे तुम्ही कार्यालयामध्ये येता आणि बाहेर जाता या वेळेमध्येच तुम्ही काही वेळ जरा बाजूला काढू शकता. हा वेळ, अर्थातच तुमच्या काही महत्त्वाच्या कामाच्या वेळेवर घाला घालण्याच्या हेतूने नाही, म्हणजे जेवणाची सुटी, कॉफीची वेळ, विश्रांती, गप्पागोष्टींची वेळ, तिकिटं विकण्याची वेळ, सुट्ट्यात काय करायचं आहे याची चर्चा, मित्रांना आणि नातेवाईकांना महत्त्वाचे कॉल करण्याचा वेळ, कालच्या टिव्हीवरच्या कार्यक्रमांची चर्चा आणि क्रिकेटमुळे काय काय घोळ होऊ शकतात, यावर चर्चा, या महत्त्वाच्या कामावर घाला घालण्याचा आमचा विचारही नाही. आम्ही फक्त आमच्या कर्मचाऱ्यांना एवढीच विनंती करीत आहोत की कामाच्या मध्ये जी 'सुट्टी' त्यांना मिळते त्या वेळेचा फक्त त्यांनी तंतोतंत उपयोग करावा.

- बरेचसे कर्मचारी हे त्यांचं काम फारसं गांभिर्याने करीत नसतात. त्याचा सरळ सरळ परिणाम म्हणून त्यांच्या कंपनीचं प्रचंड नुकसान होत असतं. ही अध्यक्षांनी केलेली उद्धोषण अतिशय कल्पक अशी होती. या उद्धोषणेमध्ये ज्या सौम्य शब्दामध्ये स्थितीचं वर्णन केलं होतं त्याची कर्मचाऱ्यांनी स्तुती केली. ही बाब अतिशय गंभीरपणे घेतली आणि काम इतक्या परिश्रमाने करायला सुरुवात केली

की काही दिवसातच कंपनीला भरपूर फायदा झाला.

## ७८

# आपल्याला ज्ञान कसे प्राप्त होईल?



एका माणसाला ज्ञान प्राप्तीची खूप तीव्र इच्छा होती, त्यासाठी गुरु शोधावा म्हणून त्याने बराच शोध घेतला. बराच कठीण आणि श्रमवणारा प्रवास झाल्यानंतर, त्याला एक साक्षात ज्ञानरुपी गुरु सापडला. त्या दोघांमध्ये जे काही संभाषण झालं, ते खाली दिलं आहे...

'मी ज्ञानप्राप्तीसाठी कुठे जावे?'

'अगदी इथंच...'

'ती ज्ञानप्राप्ती केव्हा घडेल?'

'अगदी या क्षणीही...'

'मग मला त्याचा का बरे अनुभव येत नाही?'

'कारण तू पाहातच नाहीस.'

'मी नेमके काय पाहावे?'

'काही नाही, फक्त पाहात राहावे.'

'कशाकडे?'

'ज्याकडे तुझे डोळे स्थिर राहू शकतील.'

'मी काही वेगळ्या दृष्टीने पाहावे काय?'

'काही नाही, नेहमी सहज पाहतोस तसेच...'

'पण नेहमी मी सहज पाहात नाही का?'

'नाही.'

'तुम्ही असं का म्हणता?'

शेवटी गुरुंनी त्याच्या या प्रश्नाला उत्तर दिलं.

## ■ प्रश्न :

- गुरुंनी सरतेशेवटी काय उत्तर दिलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ‘कारण, बघण्यासाठी तू इथं हवास. तू बऱ्याचवेळा दुसरीकडेच कुठेतरी असतोस.’
- मानवी मनाच्या सतत भटकत्या स्वरुपाचं चित्रण करण्यासाठी ही कथा सांगितली आहे. माणसाचं मन म्हणजे एका खोडकर माकडासारखं असतं, जे या जागेवरुन त्या जागेवर, या माणसाकडून त्या माणसाकडे, आणि या कल्पनेकडून त्या कल्पनेकडे उड्या मारतच राहतं. आपण जर मनाचं निरीक्षण केलं तर आपल्या हे लक्षात येईल की आपलं मन एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणाकडे किती वेगाने धावत असतं. केवळ वर्तमानामध्ये पूर्णपणे आणि समग्रतेने कसं राहायचं हे ज्ञानामध्ये अभिप्रेत आहे. वर्तमानामध्ये सजग राहणं हेच ज्ञान! मनाला ज्ञानाची अवस्था प्राप्त करून देण्यासाठी आपण मनाला आता आणि इथंच कसं जगायचं हे शिकवलं पाहिजे.

## ७९

# काळजीला जिंका



एका स्त्रीला प्रापंचिक गोष्टीची काळजी करणं भाग पडलं होतं, तिला एक हिरेजडित कंकण सांभाळण्यासाठी दिलं होतं. तिची मैत्रिण कुठे गावाला गेली होती आणि आपण नसताना आपल्या या कंकणाला आपली ही मैत्रिण जीवापाड जपेल याची तिला खात्री होती. या स्त्रीने जिला त्या कंकणाची काळजी घेणं आता भाग होतं, तिने ते ठेवण्यासाठी आता एक छानशी पेटी आणण्याचं ठरवलं. पण ती पेटी आणण्यासाठी ती ज्याच्याकडे गेली त्याने ते कंकण पाहून म्हटलं...

## ■ प्रश्न :

- त्या रत्नपारख्याने काय म्हटलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- त्या रत्नपारख्याने असं म्हटलं की ते कंकण काही नवी पेटी विकत घेऊन ठेवावं, इतकं महागडं नाही. त्यातले सारे हिरे हे नकली असल्याचे त्याने सांगितले. ते ऐकून प्रथम ती स्त्री थक्कच झाली, मग म्हणाली, ''देवा आभार! माझी काळजी आता संपली.''
- आयुष्यातल्या अनेक अनावश्यक गोष्टींना आपण उगाचच महत्त्व देतो आणि त्यामुळे आपण स्वत:साठी काळजी तयार करून ठेवतो. पण, या प्रश्नांचं उत्तर नेहमी आपल्याच हातामध्ये असतं. पण जेव्हा आपण अगदी ठामपणे ठरवतो की या साऱ्या गोष्टींचा शेवट करायचाच, तेव्हा आपण या काळजीचाही शेवट करतोच.

८०

# तुम्हाला थोडेच ज्ञान आहे, हे समजून घ्या



एके दिवशी, थॉमस अल्वा एडिसन, जे एक मोठे शास्त्रज्ञ होते, त्यांना एका शाळेत मुलांसमोर भाषण करण्यासाठी आणि प्रोत्साहनपर बोलण्यासाठी बोलावण्यात आले. एडिसनने मुलांसोबत छान वेळ घालवला. मग त्याने आपल्या वैज्ञानिक संशोधनाबद्दल मुलांना सांगितलं. आता एवढा मोठा शास्त्रज्ञ आपल्या शाळेमध्ये आला हे पाहून मुलंही उत्साहित झाले आणि त्यांनी त्याला बरेच प्रश्न विचारले. त्यांनीही अतिशय संयमाने प्रत्येक मुलाच्या प्रत्येक प्रश्नाला उत्तर दिलं. त्यापैकी एका मुलाने त्यांना विचारलं, ''तुम्ही एवढं ज्ञान कसं काय मिळवलं?'' या प्रश्नाला उत्तर देताना एडिसन म्हणाले...

## ■ प्रश्न :

- एडिसनचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- एडिसन उत्तरले, ''मला तर काही आठवत नाही, पण दुसरे सांगतात बुवा की मी अभ्यासामध्ये खूप चांगला होतो.''
- शहाणपण आणि ज्ञान हे प्रथम नम्रतेमुळे येते आणि त्यानंतर इतरांकडून सतत ज्ञानप्राप्ती केल्याने मिळते. सतत काही तरी नवे शिकण्याची एक ओढ माणसामध्ये असली पाहिजे. ज्या क्षणी तुम्हाला स्वत:बद्दल असा गैरसमज होतो की आपल्याला सारं काही कळलं आहे किंवा आपण फार शहाणे झालेलो आहोत, त्या दिवशीपासून तुमचा प्रवास हा विनाशाकडे चालू झाला, असे समजायला हरकत नाही. असा विनाश एखाद्याला संपवायला पुरेसा असतो. याच आशयाचं आयझॅक न्यूटनचं एक अवतरण आहे....

''मी जगात कसा दिसतो हे मला माहीत नाही, पण मला तरी असं वाटतं की मी म्हणजे समुद्राच्या किनाऱ्यावर खेळणाऱ्या एखाद्या मुलासारखा दिसत असेल आणि मी इथून तिथं उड्या मारत हुंदाडत समुद्रकिनाऱ्यावर गारगोट्या किंवा जराशा सुंदर शिंपल्यांना तिथं शोधतोय. हे सारं वास्तव तो समुद्र

माझ्यासमोर उघडपणे मांडून बसलेला आहे.'' श्रेष्ठ माणसांची ही सारी नम्रता हीच खरं तर त्यांच्या मोठेपणाचं रहस्य असतं.

८१

# तुमच्या आयुष्यातला प्रत्येक सेकंद हा सुंदर बनवा



सॉक्रेटिस हा कारागृहामध्ये होता आणि दुसऱ्या दिवशी सकाळी त्याला विषाचा प्याला द्यायचा होता, त्याला मारलं जाणार होतं. त्याचक्षणी त्याच्या असं लक्षात आलं की त्याच्यासोबत असणारा एक दुसरा कैदी कुणा एका कवीचं एक अवघड गीत अतिशय सुरेल गात होता. ते ऐकून सॉक्रेटिस त्याच्याकडे गेला आणि त्याला ते शिकवण्याची विनंती केली. ''तुला आता ते कशाला शिकायचं आहे? उद्या सकाळी तर तू मरणार आहेस ना?'' त्या गाणाऱ्याने म्हटले. सॉक्रेटिस त्याला म्हणाला....

## ■ प्रश्न :

- सॉक्रेटिसचं त्याला काय उत्तर होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ''कारण मग मी उद्या हे समजून शांतपणे मरेन की मरण्यापूर्वी मी आयुष्यात एक गोष्ट नवी शिकलो, ''तो तत्त्वज्ञानी म्हणाला.
- आपण या सुंदर पृथ्वीतलावर जो प्रत्येक क्षण जगत असतो, त्याबद्दल आपण भगवंताचे आभार मानायला हवे. सॉक्रेटिससारखी माणसं त्यांच्या सजगपणातील प्रत्येक क्षण सुंदर बनवतात. प्रत्येक सेकंद काही तरी नवे शिकवतो आणि आपले ज्ञान वाढवण्याची संधी देतो.

८२

# दोन बायका असण्याचा त्रास



करीमचं नुकतंच लग्नं झालं होतं, आणि त्याचं वैवाहिक जीवन अगदी मस्त चाललं होतं. एके दिवशी किराणा दुकानामध्ये त्याचा मित्र सलीम त्याला भेटला. करीम त्याला त्याच्या वैवाहिक आयुष्याबद्दल सांगू लागला की त्याचं आयुष्य किती सुखकर चालू आहे. आता गंमत अशी की सलीमला दोन बायका होत्या. त्याने करीमला सांगितलं की बघ, एक लग्नं झालं तर एवढा आनंद आहे, तर दोन लग्नं केलं तर आनंद दुप्पटच होणार.

करीमलाही ते पटलं, आणि त्यानेही दुसरं लग्नं केलं. दुसरं लग्नं झाल्यानंतर करीम संकटात सापडला. एकही बायको त्याच्यासोबत राहायला तयार होईना. पहिली यासाठी तयार नव्हती की त्याने दुसरं लग्नं केलेलं तिला आवडलं नव्हतं आणि दुसरी यासाठी राहात नव्हती की त्याचं पहिलं लग्नं झालेलं होतं. दोन्हीकडून नाकारला गेलेला करीम सरळ मशीदीमध्ये रात्र काढण्यासाठी गेला. तिथं त्याला एका ओसरीवर सलीम अगदी निवांतपणे झोपलेला दिसला. करीमने त्याला उठवलं आणि दुसरं लग्नं करण्याचा सल्ला का दिलास म्हणून रागात विचारलं. सलीमने उत्तर दिलं....

**■ प्रश्न :**

- सलीमचं उत्तर काय होतं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- सलीम शांतपणे म्हणाला, ''मला मशीदीमध्ये एकट्याला फार भयाण वाटत होतं आणि कुणाचीतरी सोबत असावी असं मला वाटत होतं म्हणून...''
- दुसऱ्यांच्या सल्ल्यावर काहीही करु नका. कुठलाही निर्णय घेण्यापूर्वी त्याचे फायदे काय आणि तोटे काय यांचाही विचार करा.

## ८३

# मलमपट्टीला सन्मानचिन्ह बनवा



जवाहरलाल नेहरू यांची वयस्कर आई, श्रीमती स्वरुपराणी ही फार मोठी देशभक्त होती आणि स्वातंत्र्यसंग्रामामध्ये त्यांनी बरंच कार्य केलं होतं. एकदा, एका राजकीय मिरवणुकीचं नेतृत्व करीत असताना कोणीतरी खोडसाळपणे दगड मारल्याने त्यांच्या डोक्याला जखम झाली. त्यांना चक्कर येऊन त्या पडल्या आणि खूप रक्त गेलं. मग कुठल्याशा पोलीस अधिकाऱ्याने त्यांना त्यांच्या राहत्या घरी आनंदभुवन येथे आपल्या गाडीमध्ये घालून नेऊन सोडले. या घटनेमुळे जवाहरलाल नेहरु फारच नाराज झाले आणि त्यांना आईची खूपच काळजी वाटली. एक महिन्यानंतर, नेहरुंना अटक करून बरेलीच्या जेलमध्ये ठेवण्यात आलं, आणि तेव्हा स्वरुपराणी त्यांना भेटण्यासाठी तिथं गेल्या, तेव्हा डोक्याच्या जखमेला बांधलेली पट्टी अजुनही तशीच होती. तेव्हा त्यांनी आईला विचारलं की डोक्याला जखम असूनही तिथं भेटायला येण्याचा त्रास का करून घेतला?

तेव्हा त्यांनी त्या मलमपट्टीवर विनोद करीत म्हटलं...

### ■ प्रश्न :

- त्या काय म्हणाल्या?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- त्या म्हणाल्या, ''जवाहर, ही खरं तर माझ्यासाठी मलमपट्टी नाही, तर सन्मानचिन्हच आहे. मला त्याचा अभिमान आहे आणि ते सगळीकडे मिरवायला मला आवडेल.''
- देशाच्या भल्यासाठी लढताना जी जखम झालेली असते, ती सन्मानचिन्हाप्रमाणे असते आणि अभिमानाची बाबही असते. लोकं स्वखुशीने आपलं जीवन राष्ट्रासाठी अर्पण करतात. आपण अनुकरण करावं, असं ते उदाहरण आहे.

## ८४

# ढोंगीपणापासून दूर रहा



एकदा एका शिक्षिकेने एक चॉकलेटचा डबा आणि एक शहाणपणा शिकवणारं पुस्तक दोन्हीही वर्गात आणले. मग तिने ते टेबलावर शेजारी शेजारी ठेवले आणि विद्यार्थ्यांना त्यापैकी एक निवडायला सांगितलं. सारी मुलं त्या पुस्तकाभोवती गोळा झाली आणि हे पुस्तक वाचणं किती चांगलं असू शकेल, यावर चर्चा करु लागली. तथापि, तिथं एकजण होता ज्याने सरळ चॉकलेटचा डबा उघडला आणि आनंदाने एकेक चघळायला सुरुवात केली. सगळ्या मुलांच्या प्रश्नार्थक नजरा पाहून शिक्षिका म्हणाली...

**■ प्रश्न :**

- शिक्षिका काय म्हणाली?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- ''मला तर चॉकलेटच्या या डब्यामध्ये त्या पुस्तकात जेवढं शहाणपण शिकवलं आहे, तेवढंच दिसतंय.'' शिक्षिका म्हणाली.
- ज्या मुलाने चॉकलेटच्या डब्याची निवड केली, त्याचं हृदय खरं तर प्रामाणिक होतं ◌ ढोंगीपणा काही जास्त काळ चालत नाही. ढोंगीपणापासून दूर राहणे शिकले पाहिजे. आणि आपल्या हृदयाची हाक ऐकली पाहिजे.

८५

# प्रावीण्याकडे लक्ष द्या



थॉमस ग्रे याची ‘एलेगी रिटन इन अ कंट्री चर्चयार्ड’ ही सुंदर कविता प्रसिद्ध आहे, इतकी की ब्रिटीश म्युझियममध्येही तिला स्थान मिळाले आहे. पण, बऱ्याचजणांना हे माहिती नसेल की कविता पंच्याहत्तर वेळा लिहिल्यानंतरच त्या कवीचं समाधान झालं.

**■ प्रश्न :**

- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- प्रावीण्य सहजासहजी मिळतच नाही. त्यासाठी पूर्ण समर्पण आणि तुम्ही जे काय करीत असाल त्यामध्ये पूर्ण प्रावीण्य मिळवण्याचा ध्यास हवा. जर प्रावीण्य आणि परिपूर्णता हेच तुमचं उद्दिष्ट असेल आणि तुम्ही खूप कष्ट करीत असाल, तर त्यापासून तुम्हाला कोणी दूर ठेवू शकत नाही.

८६

# तुम्ही नशीबाला प्रारब्धापासून वेगळे कसे कराल?



एकदा एक दु:खी स्त्री तिच्या गुरुकडे आपल्या नशीबाबद्दल तक्रार करण्यासाठी गेली. गुरु तिला म्हणाले, ''पण तुम्ही तर तुमचं नशीब स्वत: घडवू शकता.'' तेव्हा ती स्त्री म्हणाली, ''पण, मी एक स्त्री म्हणून जन्मले यात माझा तर काहीही दोष नाहीये ना?'' तेव्हा गुरु म्हणाले...

**■ प्रश्न :**

- तेव्हा गुरु काय म्हणाले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- तेव्हा गुरु म्हणाले, ''तुझा जन्म एक स्त्री म्हणून झाला हे तुझे प्रारब्ध आहे. ते तू बदलू शकत नाहीस. पण, याच तुझ्या प्रारब्धामध्ये तू काय काय करुन दाखवू शकशील ते तुझं नशीब.''
- प्रारब्ध हे आपल्या आयुष्यातले वास्तव आहे. त्याविषयी कुठलीही अंधश्रद्धा नाहीये. बऱ्याच गोष्टी आपल्या आयुष्यामध्ये आपल्या जाणीवेच्या आणि नियंत्रणाच्या पलिकडे असतात. ह्या गोष्टींना आपण प्रारब्ध म्हणू शकतो. जन्म हे प्रारब्ध आहे. त्याचप्रमाणे मृत्यू हे ही प्रारब्ध आहे. त्यावर आपलं काहीही नियंत्रण नाहीये. पण नशीब घडवणं हे मात्र आपल्या हातामध्ये आहे. आपले विचार, भावना आणि कृती यांच्या साहायाने नशीबाला आकार दिला जाऊ शकतो.

८७

# आशावादी बना



ही दोन बादल्यांची कथा आहे, ज्या रोजच सकाळी विहिरीमध्ये जायच्या. त्यातील एक म्हणाली, ''हे फार त्रासदायक आयुष्य आहे, बाई! मी कितीही वेळा विहिरीतून भरून आले ना, तरीही लगेच बाहेर आल्यावर रिकामी हाते.'' ''अगं पण...'' दुसरी बादली आनंदाने चित्कारत म्हणाली, ''मला बाई नाही असं वाटत, पण...''

**■ प्रश्न :**

- दुसरी बादली काय म्हणाली?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- मला तर अशी मज्जा वाटत असते की काही हरकत नाही, कितीही वेळा मला विहिरीत जाणं का होईना, पण मला असं वाटतं की मी कुणाची तरी तहान भागवण्यासाठी समर्थ आहे म्हणून...''
- आयुष्य प्रत्येकाला अशी संधी देतच असते, पण त्याकडे कोण कोणत्या दृष्टिकोनातून पाहतो, हे त्यावर अवलंबून आहे आणि त्यातून कसा अर्थ काढतो, यावर अवलंबून आहे. एक आशावादी वृत्ती बनवणं, हे आपल्या हातामध्ये आहे आणि प्रत्येक गोष्टीमध्ये एक सकारात्मक बाजू असते, याकडे लक्ष द्यायला हवे. जर आपण जरा नुसते बसलो आणि आपल्या शरीरातील किंवा मनातील अपूर्णत्व किंवा आपल्याला ज्या परिस्थितीला तोंड द्यावे लागतेय ती परिस्थिती याविषयी जर विलाप करीत बसलो तर आपलं आयुष्य असंच आत्मवंचनेमध्ये जाईल आणि वाया जाईल.

८८

## सहृदयतेने क्षमा करा



एका पाद्र्याकडे त्याच्या आश्रमामध्ये बायबलची एक जुनी मौल्यवान प्रत होती. एकदा एक माणूस त्या आश्रमामध्ये त्या पाद्र्याला भेटण्यासाठी आला. म्हणजे तो तसा तिथं त्या पाद्र्याचा शिष्य बनण्यासाठी आलेला असला तरीही त्याला ती बायबलची प्रत चोरण्याची तीव्र इच्छा झाली. जेव्हा तो पाद्री बायबल वाचण्यासाठी गेला, तेव्हा त्याच्या हे लक्षात आलं की बायबल चोरीला गेलं आहे अणि ते नव्या पाहुण्याने घेतलं आहे, हेही त्यांच्या लक्षात आलं. पण त्यांनी त्याला तसं काहीही म्हटलं नाही कारण उगाचच त्याने चोरी केली अशी खोटी साक्ष देण्याचं पाप होऊ नये, असं त्यांना वाटलं.

पुढे गंमत अशी झाली की ज्या माणसाने ते बायबल चोरलं होतं, तो एका जुन्या संग्राह्य वस्तू विकण्याच्या एका दुकानामध्ये ते पुस्तक विकण्यासाठी गेला. त्याला त्याचे शंभर पौंड हवे होते. दुकानदार म्हणाला, ''ते पुस्तक जरा माझ्याकडे द्या, मी पाहतो की खरेच त्या पुस्तकाची किंमत तेवढी आहे का?'' नशीबाने ते पुस्तक घेऊन तो दुकानदार पुन्हा त्याच पाद्र्याकडे आला आणि त्यांना विचारलं, ''सर, जरा हे पुस्तक पाहा आणि या पुस्तकांची किंमत शंभर पौंड द्यावी की कसे, हे जरा सांगता का?''

त्या पाद्र्याने म्हटलं, ''होय, खूप किंमतीचं पुस्तक आहे ते आणि शंभर पौंडाला म्हणजे चांगलं मिळतंय.''

मग दुकानदार पुन्हा त्या पुस्तक विकायला आलेल्या माणसाला भेटला आणि म्हणाला, ''हे घ्या शंभर पौंड. मी हे बायबल त्या आश्रमातल्या पाद्रयांना दाखवलं आणि ते म्हणाले की एवढी त्याची किंमत खरोखरच आहे.''

तो माणूस उडालाच, ''ते असं म्हणाले? अजून काही म्हणाले का?''

''नाही, ते एक शब्दही जास्त बोलले नाहीत. पण तुम्ही का विचारता?''

### ■ प्रश्न :

- ज्या माणसाने ते पुस्तक चोरलं होतं आणि विकायला आणलं होतं त्याची काय प्रतिक्रिया होती?
- या कथेचे तात्पर्य काय?

## ■ उत्तरे :

- तो माणूस म्हणाला, ''मी माझा विचार बदलला आहे आणि मला ते पुस्तक विकायचंच नाहीये.'' तो पुन्हा त्या पाद्र्याकडे गेला आणि त्यांचे पाय धरले, क्षमेची भीक मागितली. ती बायबलची प्रत पुन्हा वापस घ्यावी म्हणून विनंती केली.'' ''नाही बंधो, राहू दे तुझ्याजवळच. माझ्याकडून ती तुला भेट दिली असे समज.'' पण तो माणूस म्हणाला, ''पण जर तुम्ही परत घेतली नाही, तर मला शांतता लाभणार नाही.'' त्यानंतर तो माणूस खऱ्या अर्थाने आश्रमामध्ये गेला आणि त्याने उरलेलं आयुष्य त्या आश्रमाच्या कार्यासाठी खर्च केलं.
- क्षमेमुळे गुन्हेगारांच्या बऱ्याच मतांचं परिवर्तन होतं. त्याचा नेहमीच सकारात्मक परिणाम होतो आणि दोषांना दुरुस्त करण्यास त्याची मदत होते.

''दान अनेक प्रकारचे असते, ज्यांच्यामुळे आपल्या पापांसाठी आपल्याला क्षमा मिळण्यासाठी मदत होते; पण कोणी आपल्याशी पापवर्तन केलेले असतानाही आपण त्याला त्यासाठी क्षमा करणे, यासारखे दुसरे मोठे दान काहीही नाही.''

-सेंट ऑगस्टीन ऑफ हिप्पो

८९

# किंमत जेवढी जास्त तेवढंच महत्त्व जास्त



एका जोडप्याकडे एक डॅलमॅटियन कुत्री होती. काही वर्षांनंतर तिला गर्भ राहिला आणि लवकरच तिला पाच लहान लहान पिलं झाली. आता त्या जोडप्यासमोर हा मोठा प्रश्न पडला की त्यांच्या पदरी पडलेली ही पाच सुंदर आकर्षक पिलं कशी काय बाहेर काढावीत. त्या माणसाने बऱ्याच जणांना सांगितलं की पिलं हवी असल्यास घेऊन जा, पण कोणालाही त्यात रस नव्हता. त्यांनी स्थानिक आकाशवाणीवरूनही तशी उद्घोषणा केली, पण छे, कुणीही विकत घ्यायला आलं नाही. सरतेशेवटी, जेव्हा शेजारचा माणूस त्यांना भेटायला आला, तेव्हा त्याने नेमकं काय होतंय, हे सांगितलं. मग ती पिलं कशी काढायची, याचा सल्ला त्याने दिला.

**■ प्रश्न :**

- शेजाऱ्याने दिलेला सल्ला काय होता?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- शेजाऱ्याने त्यांना असा सल्ला दिला की अशी जाहिरात द्या की कुत्र्याचं प्रत्येक पिल्लू हे पंचवीस डॉलर्सला द्यायचं आहे.
- कोणतीही गोष्ट फुकट दिली की त्याची काहीही किंमत राहात नाही. जेवढी किंमत जास्त तेवढंच त्याचं महत्त्वही जास्त!

## १०

# प्रत्यक्षात कृती करून दाखवा



अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या काळामध्ये युद्धाची तयारी चालूच होती. एका कोपऱ्यामध्ये एका साध्या वेशातील माणसाला असे दिसले की एक सैन्यातील नायक त्याच्या हाताखालच्या सैनिकांना अतिशय उद्धटपणे एक जड खांब उचलण्यासाठी सांगत होता. हा माणूस त्या नायकाजवळ गेला आणि त्याला विचारलं की तुम्ही तो खांब उचलायला का बरं मदत करीत नाहीत? तेव्हा तो सैन्यातील नायक म्हणाला, ''मी नायक आहे...'' त्या माणसाने शांतपणे त्या सैनिकांना त्यांचं काम करण्यासाठी मदत केली. मग तो त्या नायकाकडे गेला आणि त्याला काही तरी म्हटलं, ते ऐकून तो नायक अवाक् झाला.

### ■ प्रश्न :

- त्या माणसाने त्या नायकाला काय सांगितलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- ''श्री. नायक, जेव्हा केव्हा तुमच्याकडे कामासाठी पुरेशी माणसं नसतील तेव्हा फक्त एकवार सेनापतींना सांगा आणि मी तुमच्या मदतीला येईन.'' एवढं म्हणून जॉर्ज वॉशिंग्टननी आपला कोट घातला आणि तिथून निघून गेले.
- जो माणूस सन्मानाने सर्वांशी बोलतो, त्याच्याचविषयी सर्वांच्या मनामध्ये आदर राहतो. कोणतंही काम हलकं किंवा भारी असं नसतं. कोणतंही काम करताना लाज न वाटू देता प्रत्येकाने काम केलं पाहिजे.

## ११

# चतुर बना



हेन्री वार्ड बीचर हा एक मान्यवर असा प्रवचनकार होता. अनेक लोकं त्याच्यावर भरभरून प्रेम करायचे, पण नाक मुरडणारी मंडळीही बरीच होती. बीचर विशेषत: त्याच्या प्रवचनामध्ये तो जे चातुर्य दाखवायचा त्यासाठी प्रसिद्ध होता. या मोठ्या प्रवचनकाराला कोणीही सहजासहजी फसवू शकत नसे. बीचर हा मोठमोठ्या समुहासमोर बोलण्यासाठी अतिशय पारंगत होता आणि लोकांना योग्य ते मार्गदर्शनही तो करीत असे. प्रत्येक प्रवचनाच्या, व्याख्यानाच्या वेळी तो लोकांना त्यांचे प्रश्न काय हे एका चिठोऱ्यावर लिहून काढायला सांगायचा आणि बाजूला ठेवलेल्य डब्यामध्ये टाकायला सांगायचा. त्यानंतर मोठ्याने तो प्रश्न वाचायचा आणि मग त्यावर काय उपाय आहे, हे सांगायचा. एके दिवशी, एका प्रवचनामध्ये त्याच्या त्या डब्यामध्ये एक पाकिट कोणीतरी टाकलं होतं, ज्यामध्ये फक्त एक कागद होता, ज्याच्या मध्यभागावर लिहिलेलं होतं, 'मूर्ख'. वार्ड बीचरने ते अशा पद्धतीने सांगितलं की लोकांमध्ये हशा उसळला...

### ■ प्रश्न :

- बीचरने काय सांगितलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

### ■ उत्तरे :

- तो म्हणाला की आजपर्यंत त्याला अशी अनेक पत्रे मिळाली की ज्यामध्ये लोकांनी आपले प्रश्न लिहिले, मात्र ते स्वत:चं नाव टाकायचं विसरले. पण या पत्रात लिहिणाऱ्याने आपलं नाव टाकलं आणि मजकूर लिहायचं विसरून गेला आहे.
- निनावी पत्राला अशा पद्धतीने अगदी नम्रपणे फटकारता येतं.

१२

# चुका स्वीकारा, पण खुबीने...



डॉ. सॅम्युअल जॉन्सन यांनी एक नवा शब्दकोश प्रसिद्ध केला होता. ज्याचं स्वागत जनतेकडून तसंच समीक्षकांकडूनही अतिशय चांगलं झालं त्या प्रकाशनाचं हे यश साजरे करण्यासाठी त्यांनी डॉ. सॅम्युअल जॉन्सन यांच्या सन्मानार्थ एक मेजवानी आयोजित केली. मेजवानीच्या प्रसंगी प्रत्येकजण त्या शब्दकोशाची गुणवत्ता आणि त्यातील शब्दांचा समावेश यांची स्तुती करीत होता. डॉ. जॉन्सनही त्यांच्या बुद्धीमत्तेच्या जोरावर उपस्थित असलेल्या सर्व लोकांवर छाप पाडत होते. सगळेजण त्यांच्या त्या शब्दकोशाची स्तुती करीत असताना, एका वयस्क स्त्रीने मध्येच त्यांना थांबवले आणि एवढ्या मोठ्या बुद्धीमान माणसाने एवढं प्रचंड बौद्धिक काम करूनही त्यात एक चूक कशी काय राहिली, याबद्दल आश्चर्य व्यक्त केलं. मग तिने त्यांना विचारलं, ''या न्यूनतेबद्दल तुम्ही काय म्हणाल?''

उपस्थित असलेला प्रत्येकजण तिच्या या उद्धटपणामुळे आश्चर्यचकित झाला. जॉन्सन काय उत्तर देतात, याविषयी सगळेजण उत्सुक झाले.

## ■ प्रश्न :

- डॉ. जॉन्सन यांनी काय उत्तर दिले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- डॉ. जॉन्सन थंडपणे म्हणाले, ''अज्ञान, बाईसाहेब, शुद्ध अज्ञान! कृपया, मला क्षमा करा.''
- डॉ. जॉन्सन यांचा नम्रपणा वाखाणण्यासारखा आहे. श्रेष्ठ माणसाची पहिली परीक्षा म्हणजे नम्रता! दयाळू माणूस हा त्याच्या मर्यादांमुळे चुका होऊ शकतात, हे स्वीकारतो. त्याला हे कबूल करायला अजिबातच अपमानास्पद वाटत नाही की त्याला जे कळलंय, ते फार थोडं आहे आणि खूप काही शिकायचं बाकी आहे.

१३

# मध्यममार्ग स्वीकारा



बुद्धाला जेव्हा आध्यात्मिक प्रश्न पडले, त्यांनी जेव्हा साधनेच्या क्षेत्रामध्ये पादाक्रमण केले, तेव्हा त्यांनी बऱ्याच वेगवेगळ्या साधनांचा अवलंब केला. आध्यात्मिक मार्गावरचा प्रवास म्हणजे काही गुलाबांच्या पाकळ्यांवरून चालणं नव्हे. त्यावेळी त्यांचा दृढ विश्वास होता की साक्षात्काराचा मार्ग हा तप आणि कठोर साधनांमधूनच जातो. हे साधण्यासाठी त्यांनी स्वत:ला फारच क्लेश दिले. एके दिवशी, ते एका झाडाखाली ध्यानासाठी बसले होते. अचानक त्याचं ध्यान दोन संगीतकारांच्या संवादामुळे तुटलं. एक दुसऱ्याला म्हणत होता, ''सतारीच्या तारा एवढ्या घट्ट आवळू नकोस, कदाचित त्या तुटतील आणि फार ढिल्याही सोडू नको, नाही तर त्याच्यातून संगीत निर्माण होणार नाही.'' या शब्दांमुळे बुद्धासमोर एक रहस्य उलगडलं आणि त्याप्रमाणे त्यांनी साधनेचा मार्ग बदलला.

## ■ प्रश्न :

- त्या संगीतकारांच्या संवादामधून बुद्ध काय शिकले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- कुठल्याही गोष्टी टोकाच्या करू नका. जर यश मिळवायचे असेल तर मध्यम मार्ग स्वीकारा.
- कुठलीही गोष्ट अगदी टोकाची केली की त्याचा परिणाम वाईट होतो. कुठलीही गोष्ट संयमाने केली की त्यात प्रगती होऊन शेवट यशस्वी होण्याची शक्यता जास्त असते.

# १४

# एक करोड रुपये देऊनही आपण एक सेकंद विकत घेऊ शकत नाही



कोणे एके काळी एका गावामध्ये एक कंजुष माणूस राहात होता, ज्याचं सारं आयुष्य हे पैसा गोळा करण्यातच गेले, आणि त्याने कधीही एक पैसा ही खर्च केला नाही. त्याने जवळपास पाच लाख दिनार गोळा केले होते आणि उरलेलं आयुष्य अगदी विलासामध्ये जगण्याचं तो स्वप्नं पाहात होता. पण असं काही होण्यापूर्वीच, यमदूत त्याला घेऊन जाण्यासाठी तिथं आले. त्या कंजुष माणसाने त्याच्यासमोर हात पसरले, विनंती केली आणि पृथ्वीतलावर जास्त काळ राहायला मिळावं म्हणून आर्जवेही केली. ''मला फक्त तीन दिवस द्या, मी तुम्हाला माझ्या संपत्तीतला अर्धा वाटा देतो.'' त्या दुतांनी त्याच्याकडे लक्षही दिलं नाही. ''असं करा फक्त एकच दिवस द्या. मी एवढं कष्ट करून मिळवलेलं सारं काही तुम्हाला देऊन टाकेन.'' दूत अद्यापही तटस्थच होते.

मग, त्या माणसाने त्यांना विनंती केली की पुढच्या पिढ्यांसाठी काही लिहून ठेवतो, काही सेकंद तरी थांबा. दूतांनी त्याची ही इच्छा मात्र मान्य केली. त्याने पुढचा मजकूर लिहून ठेवला.

## ■ प्रश्न :

- त्या कंजुष माणसाने काय लिहून ठेवले होते?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- त्या कंजुषाने लिहिले होते. ''ज्याला कुणाला हे मी लिहून ठेवलेले सापडेल, त्याच्यासाठी हे सांगणे आहे की जर तुम्हाला चांगलं जगण्यापुरतं मिळालेलं असेल तर उरलेलं आयुष्य पुढे उगाच जमा करण्यासाठी वाया घालवू नका. जगा! माझे पाच लाख दिनार माझ्या आयुष्यासाठी एक सेकंदही विकत घेऊ शकले नाहीत.''

- त्या कंजुषाने लिहून ठेवलेला मजकूर हाच मुळामध्ये या कथेचे तात्पर्य आहे. मृत्यू हा प्रत्येकासाठी अगदी अपरिहार्य आहे, त्यामुळे उगाचच धन जमा करण्यासाठी एक विशिष्ट मर्यादेपलिकडे जाण्यात काहीही हाशील नाही.

९५

# तुम्ही जे मागता त्याबाबतीत जरा सावध असा



कोणे एके काळी एक अतिशय गरीब माणूस होता, जो त्याच्या जगण्यासाठी लाकडांची मोळी आपल्या डोक्यावर घेऊन वाहून न्यायचं काम करीत असे. एके दिवशी, तो त्याच्या खांद्यावर ते भलं मोठं ओझं घेऊन जात असताना फार थकला. तो नदीच्या काठावर जरासा टेकला आणि म्हणाला, ''मी आजारी आहे आणि फार थकलोय. एकदाचा यम यावा आणि आताच माझी यातून सुटका व्हावी.'' नेमकं त्याचक्षणी यम तिथं आला आणि समोर उभं राहून म्हणाला, ''आलोय मी. काय करु सांग.'' तेव्हा थक्कं झालेला तो म्हातारा म्हणाला.

## ■ प्रश्न :

- तो म्हातारा काय म्हणाला?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- तो म्हातारा म्हणाला, ''काही नाही, ही मोळी जरा माझ्या डोक्यावर उचलून देतोस का, बाबा?''
- या कथेपासून दोन गोष्टी निष्कर्ष म्हणून काढता येतात. एक म्हणजे कोणालाही मरण नको असतं, म्हणजे अगदी ते आत्महत्या करण्याच्या निर्णयाप्रत येत नाही तोपर्यंत तरी नको असतं. दुसरी बाब म्हणजे आपण जी काही इच्छा मनात धरत असतो, तीच फळाला येत असते. त्यामुळे आपणही नेहमी काय इच्छा ठेवावी याबद्दल जरा सावध असलं पाहिजे आणि आपल्या इच्छाही सावधपणे निवडल्या पाहिजे.

१६

# व्यावहारिक शहाणपणाचा विकास करा



एका अशिक्षित चांभाराच्या मनामध्ये शिकलेल्या लोकांविषयी काही तरी भलताच गैरसमज होता. एकदा एक महाविद्यालयातला प्राध्यापक त्याच्याकडे आला, त्याच्याकडे बुटाचा फक्त एकच जोड होता, आणि त्याला तो ताबडतोब दुरुस्त करून हवा होता.

''माझी दुकान बंद करण्याची वेळ झालेली आहे.'' चांभार म्हणाला, ''आताच्या आता लगेच हे दुरुस्त करणे मला काही जमणार नाही. त्यापेक्षा तुम्हीच उद्या सकाळी का बरे येत नाहीत?''

''अहो, माझ्याकडे फक्त एकच जोड आहे, आणि बुटं घातल्याशिवाय मला काही जाता येणार नाही.''

''ठिक आहे, माझ्याकडचा एक वापरलेला बुटाचा जोड मी तुम्हाला आजचा दिवस उसना म्हणून वापरायला देतो.''

''काय? दुसऱ्याच्या बुट वापरायचा? तुम्ही मला काय करायला सांगत आहात?''

त्या चांभाराने त्या प्राध्यापकांना असं काही उत्तर दिलं की ते अवाक् झाला.

## ■ प्रश्न :

- त्या चांभाराने काय उत्तर दिलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- तो चांभार म्हणाला, ''तुम्ही दुसऱ्यांचे बुट वापरायचे म्हणून एवढी कुरकूर का करता, दुसऱ्या लोकांच्या कल्पना डोक्यामध्ये घेऊन तुम्ही एरवी कामं करीत नाही का?''
- व्यावहारिक शहाणपण हे पुस्तकी ज्ञानापेक्षा केव्हाही श्रेष्ठ!

१७

# मेंदूचा वापर करायला शिका



एका स्त्रीला तिच्या नवऱ्याने कुठलेसे विजेचे उपकरण दिले होते. ते उपकरण किती गुंतागुंतीचे आहे हे समजून घेण्यासाठी तिने ते उघडून पाहिले. सोबतच्या माहितीपुस्तकानुसार तिने काही तास घालवून ते पुन्हा जोडण्याचाही प्रयत्न केला, पण पुन्हा जोडण्यामध्ये काही यश आले नाही, त्यामुळे शेवटी तिने तो नाद सोडला आणि त्याचे सर्व भाग जेवणाच्या टेबलावर सोडून ती तशीच निघून गेली. काही तासानंतर ती पुन्हा तिथं आली तेव्हा तिच्या असं लक्षात आलं की तिच्याकडे काम करणाऱ्या बाईने ते जोडून पुन्हा वापरण्यायोग्य केले होते, तिने त्या काम करणाऱ्या बाईचे आभार मानले, ''तुला वाचताही येत नसताना तू हे सारं कसं काय जोडलं?'' तिने विचारले. त्या घरकाम करणाऱ्या बाईने असे उत्तर दिलं की ही चकितच झाली.

## ■ प्रश्न :

- त्या बाईने काय उत्तर दिलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- ती बाई म्हणाली, ''काय आहे बाईसाहेब, जेव्हा तुम्हाला माहिती असतं की तुम्हाला वाचता येत नाही, तेव्हा तुम्ही तुमचा मेंदू चालवायला तयार होता.''
- विचार करण्याची नैसर्गिक देण प्रत्येकाला मिळाली आहे. तथाकथित शिकलेले लोकं ती मोठ्या प्रमाणात वापरतात, कारण त्यांना हे माहिती नसते की इतर लोकांचे विचार हेही ते न शिकल्यामुळेच आहेत. नकळत, त्यांच्यामध्ये एक प्रकारचे व्यावसायिक शहाणपण निर्माण होते. अशावेळी, अगदी निरक्षरता हा पण एक छुपा आशीर्वादच असतो. तथापि, याचा अर्थ प्रत्येकाने निरक्षर राहावे असा नाही.

१८

# कोणती गोष्ट तुम्हाला पवित्र बनवते?



एक जपानी योद्धा होता, जो बुद्धांचा अतिशय निस्सिम असा भक्त होता. एके दिवशी, त्याची बुद्धांसोबत भेट झाली आणि त्याने त्यांना विचारले, ''कोणती गोष्ट माणसाला पवित्र बनवते?'' बुद्धांनी उत्तर दिलं, ''प्रत्येक तास हा काही मिनिटांमध्ये आणि सेकंदांमध्ये विभागला जातो आणि प्रत्येक सेकंद हा काही क्षणांमध्ये विभागला जातो. या सेकंदाच्या प्रत्येक क्षणामध्ये जो माणूस पूर्णपणे सजग म्हणजे जागृत राहू शकतो, तो पवित्र!'' हा जपानी योद्धा एकदा शत्रूकडून पकडला गेला आणि त्याला कारागृहामध्ये टाकण्यात आलं. त्या रात्री, त्याला उद्या आपला छळ करण्यात येणार आहे, या विचाराने क्षणभरही झोप लागली नाही.

## ■ प्रश्न :

- त्या योद्ध्याने कारागृहामध्ये झोप येण्यासाठी काय केले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- त्याला बुद्धांचे शब्द आठवले आणि या विश्वातील सत्य जे आहे, ते याच क्षणी आणि फक्त इथंच आहे याची त्याला जाणीव झाली. मग, तो भान येऊन वर्तमानात आला आणि एका क्षणामध्ये झोपला.
- या कथेचे तात्पर्य हेच आहे की ज्याच्यावर भूतकाळ आणि वर्तमानकाळाचा अजिबात प्रभाव पडत नाही, तो म्हणजे हवेत उडणाऱ्या पक्ष्याप्रमाणे आणि शेतावर झुलणाऱ्या लिलिच्या फुलाप्रमाणे आहे. त्यालाच स्वातंत्र्य आणि आनंदाचा अनुभव येत असतो. त्याला उद्याची काळजी नसते. हे पूर्णपणे प्रकट झालेलं स्वत:चं अस्तित्व म्हणजेच पवित्रपण!

## ९९

# सूडामुळे जखमा चिघळतात



इंग्लंडचा राजा आठवा हेन्री आणि फ्रान्सचा राजा फ्रान्सिस पहिला यांच्यामध्ये फार वैर होते. त्यांचा एकमेकांशी नेहमीच संघर्ष चालू असे. एकदा, राजा हेन्रीने त्यांच्या दरबारातील कुशल राजनितिज्ञ सर थॉमस मोअर यांना एक चिठ्ठी फ्रान्सिसकडे नेऊन देण्याची विनंती केली. मोअर यांना अशी भिती वाटत होती की या भानगडीमध्ये त्याचं डोकं नक्की उडवलं जाणार. तेव्हा हेन्री म्हणाले, ''मोअर घाबरु नकोस. त्यांनी जर तसं काही केलं तर मी प्रत्येक फ्रेंच माणसाचं मुंडकं लंडनमध्ये आणेल.'' त्यावर मोअर उत्तरले, ''ते फारच छान होईल, महाराज. पण...''

**■ प्रश्न :**

- राजाला प्रत्युत्तर देताना सर थॉमस काय म्हणाले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- ''पण त्यांपैकी कुठलंही मुंडकं माझ्या धडावर व्यवस्थित बसेल असं मला वाटत नाही.''
- कडवटपणाने कडवटपणा अजून वाढतो.

## ९९

# सूडामुळे जखमा चिघळतात



इंग्लंडचा राजा आठवा हेन्री आणि फ्रान्सचा राजा फ्रान्सिस पहिला यांच्यामध्ये फार वैर होते. त्यांचा एकमेकांशी नेहमीच संघर्ष चालू असे. एकदा, राजा हेन्रीने त्यांच्या दरबारातील कुशल राजनितिज्ञ सर थॉमस मोअर यांना एक चिठ्ठी फ्रान्सिसकडे नेऊन देण्याची विनंती केली. मोअर यांना अशी भिती वाटत होती की या भानगडीमध्ये त्याचं डोकं नक्की उडवलं जाणार. तेव्हा हेन्री म्हणाले, ''मोअर घाबरू नकोस. त्यांनी जर तसं काही केलं तर मी प्रत्येक फ्रेंच माणसाचं मुंडकं लंडनमध्ये आणेल.'' त्यावर मोअर उत्तरले, ''ते फारच छान होईल, महाराज. पण...''

**■ प्रश्न :**

- राजाला प्रत्युत्तर देताना सर थॉमस काय म्हणाले?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

**■ उत्तरे :**

- ''पण त्यांपैकी कुठलंही मुंडकं माझ्या धडावर व्यवस्थित बसेल असं मला वाटत नाही.''
- कडवटपणाने कडवटपणा अजून वाढतो.

१००

# विकलांगतेतून बाहेर या



के राधाबाई ही त्रिचनापल्लीच्या भारतीदासन विद्यापीठातून पी.एच.डी. पदवी प्राप्त केलेली पाहिली अंध मुलगी ठरली. हे साध्य करण्यासाठी प्रचंड हिंमत, मनोधैर्य आणि ठाम निश्चयाची गरज होती. त्यावेळी ती म्हणाली की आयुष्यामध्ये एवढ्या उंचीवर पोहचल्याचं अतीव समाधान होतंय, तेही महत्त्वाच्या ज्ञानेंद्रियाचा वापर न करता आणि तेही हे साध्य करण्यासाठी आलेल्या साऱ्या अडचणीवर मात करून हे साधल्याने जास्तच समाधान होत आहे.

■ **प्रश्न :**

- या राधाबाईच्या कथेतून कोणते तात्पर्य आपल्याला मिळते?

■ **उत्तरे :**

- खरा बुद्धीमान कुठेही नावारुपाला येतोच. शारीरिक विकलांगता ही यशाच्या मधला अडसर होऊ शकत नाही. इच्छा तेथे मार्ग!

१०१

# दिलदारपणा बाळगा



एके दिवशी, पर्ल हार्बरच्या घटनेनंतर, ब्रिगेडीयर जनरल थिओडोर रुझवेल्ट एका विमानतळावर विमानात चढण्याची तयारी करीत होते. त्याचवेळी नौसेनेतील एक खलाशी तिथंच बाजूच्या तिकिट खिडकीपाशी आला आणि एक तिकिट मिळेल का याची चौकशी करु लागला. त्यावेळी कुठलीही तिकिटाची व्यवस्था होणं शक्य नव्हतं, म्हणून त्याची विनंती मान्य करण्यात येत नव्हती. त्याला त्याच्या आईला ताबडतोब भेटणे गरजेचे आहे, असं सांगून तो सारखी विनंती करीत होता. पण तो कुणीही उच्चपदस्थ नाही म्हणून तातडीने असं कुठलंही तिकिट त्याला देणं शक्य नव्हतं, परिणामी त्याची विनंती टाळली जात होती. हे पाहून रुझवेल्ट यांनी पुढे होऊन स्वत:चं तिकिटं त्या माणसाला देण्याविषयी सांगितलं. कॅप्टन शेरीडन जे अमेरिकन एअरलाईन्सचे वैमानिक होते, त्यांनी ते पाहून जनरल यांना विचारलं की, ''सर, तुम्हाला जाण्याची घाई नाही का?'' तेव्हा रुझवेल्ट यांनी उत्तर दिलं...

## ■ प्रश्न :

- रुझवेल्ट यांनी काय उत्तर दिलं?
- या कथेचे तात्पर्य काय आहे?

## ■ उत्तरे :

- जनरल म्हणाले, ''हा मोठ्या पदाचा प्रश्न आहे. मी फक्त एक साधा जनरल आहे आणि तो एका आईचा मुलगाही आहे.''
- यावरून त्यांची माणूसकी दिसून येते आणि एका मुलाचं आपल्या आईवर जे प्रेम आहे, त्याविषयी आदर दिसून येतो. मुलाने आपल्या आईला भेटायला जाणे हे कुठल्याही कामापेक्षा श्रेष्ठ काम आहे, असे ते समजले. या अशा गुणांमुळेच ते पुढे राष्ट्राध्यक्ष होऊ शकले आणि देशाने त्यांच्यावर खूप प्रेम केलं.